# कठोपनिषद

प्रा. द. ना. दुभाषी




## जन्मशताब्दी

२००४ - २००५ स्मृती सौरभ २५



## ।। आशीर्वाद ।।



**प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी**
**सिद्धगिरी मठ, कणेरी**

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# कठोपनिषद

प्रा. द. ना. दुभाषी

**मुद्रण :**
देविका आर्ट प्रिंटर्स

**मुखपृष्ठ :**
श्री. जयेश राऊत

**मुद्रीत शोधन :**
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

**अक्षरजुळणी :**
ओंकार कॉम्प्युटर्स, डोबिंवली

**आवृत्ती पहिली :**
एप्रिल - २००५

**मुल्य : रु. ९०/-**

**प्रकाशक :**




सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

## प्रस्तावना

**'उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत ।'**

उठा, जागे व्हा व आपल्या ईप्सितध्येयास प्राप्त करून घ्या, असे आवाहन, असा संदेश ज्या उपनिषदाने प्रगट केला आहे, त्या कठोपनिषदावर प्रा. द. ना. दुभाषीसर यांनी या प्रस्तुत ग्रंथात भाष्य केले आहे. मृत्युदेवता यम आणि आत्मज्ञानाची उत्कट तळमळ असलेला नचिकेता यांच्यामधील संवादाचे वर्णन या उपनिषदात आले आहे.

समाजजीवनाची बैठक कधी प्रवृत्तीपर तर कधी निवृत्तीपर यावर आंदोलित होत असते. निवृत्तीचा विचार हा ऋषींनी आणि संतांनी आपल्या वचनातून प्रगट केला आहे. मानवी जीवनातील अनेक रहस्ये माणसाच्या चिंतनाला संधी देत आहेत. या अनेक रहस्यांपैकी ज्याला जसे सत्याचे दर्शन झाले त्याप्रमाणे त्याने समाजासमोर आणण्याचा प्रयत्न केला.

ऋषींनी आत्यंतिक सुखाचा विचार करताना आत्मज्ञान होणे व ते ज्ञान होण्यासाठी एक आदर्श साधना करणे हा एक मार्ग सांगितला. या मार्गास श्रेयस असे संबोधण्यात आले. परंतु हा मार्ग कठीण आहे. त्यासाठी ध्येयाची निश्चिती हवी. तपश्चर्या हवी. अनेक क्षणभंगुर सुखाचा त्याग हवा. धैर्य हवे. नेटाची साधना हवी. जीवन पवित्र हवे. पतन होऊ नये म्हणून दक्षता हवी. या व अशा अनेक साधनांच्या लटपटी कराव्या लागतील म्हणून हा मार्ग कठीण आहे. परंतु जगात जे साधण्यास कठीण आहे, त्याचे मोल अनमोल आहे. ज्याचे मोल नाही असे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर जी परमानंद स्थिती प्राप्त होते तीच जीवनाची इतिकर्तव्यता आहे, असे ऋषी प्रतिपादन करतात. याच मार्गास श्रेयस मार्ग असे म्हटले आहे. जी तात्कालिक सुखे इंद्रियांद्वारे भोगता येतात व ती प्राप्त करण्यासाठी जी खटपट करावी लागते त्या मार्गास प्रेयस मार्ग संबोधला आहे, ज्याचा क्षणिक का होईना सुखाचा अनुभव इंद्रियभोगाद्वारे भोगता येतो. ज्ञानासाठी जितकी धडपड लागते, तितकी करण्याची आवश्यकता नसते. जे शाश्वत नसते ते सर्व प्रेयसमध्ये येते. ज्यास आपले जीवन सार्थक करावयाचे आहे, त्याने श्रेयस मार्गाने चालावे हे या ग्रंथातून नचिकेताच्या आचरणातून दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. मृत्युदेव सर्व लौकिक सुखाची

आमिषे वराच्या रूपाने नचिकेतासमोर ठेवतात. परंतु आदर्श नचिकेता ध्येयाने प्रेरित असल्याने व आपल्या ध्येयाच्या प्रति जागा असल्याने लौकिक सुखास वश न होता, आत्मसुखाच्याच ज्ञानाची मागणी करून, प्रेयसाचा त्याग करून श्रेयसाची इच्छाच अंतिम ध्येयपूर्तीपर्यंत कायम ठेवतो. म्हणून नचिकेता हा आदर्श आणि ध्येयवादी साधक म्हणून आत्मज्ञान प्राप्तीसाठी धडपडणाऱ्या साधकांचा मानबिंदू ठरला आहे.

मानवी जीवनामध्ये अनेक गूढ बाबी आहेत. त्यापैकी मृत्यू, पुनर्जन्म, मृत्यूनंतरची जीवाची गती याबद्दल सातत्याने चिंतन व चर्चा सुरू आहेत. या सर्व गूढ बाबींवर दृष्टांतरूपाने सुंदर चर्चा नचिकेत व मृत्युदेव यांच्या संवादातून केली आहे. बुद्धीला सूक्ष्म करण्याचे उपाय यामध्ये कथित केले आहेत. आत्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी जी साधना सांगितली आहे, त्यामध्ये इंद्रिय दमन, मनोनिग्रह, कठोर वैराग्य व समर्थ गुरूकडून मिळालेले आत्मविषयक ज्ञानाची प्राप्ती यांची आवश्यकता प्रतिपादिली आहे. आत्मा हा शरीराचा प्रेरक असून तो अज, नित्य, शुद्ध, बुद्ध व सच्चिदानंद आहे व तो ज्ञानप्राप्तीनेच अनुभवता येता याचा ऊहापोह यामध्ये करण्यात आला आहे. या तत्त्वज्ञानाने भरलेल्या ग्रंथावर प्रा. दुभाषीसर यांनी आपल्या आयुष्यभराच्या साधनेतून, चिंतनातून, निदिध्यासातून भाष्य केले आहे. ते स्वतः उच्चस्थित असलेले साधक असून गेली अनेक वर्षे अत्यंत पवित्र जीवन जगत आहेत. आपणास प्राप्त असलेले ज्ञानाचे धन वाटत आहेत. सहवासात येणाऱ्या प्रत्येकावर निरपेक्ष मनापासून प्रेम करत आहेत. कोणत्याही अपेक्षेशिवाय प्रवचन सेवा करत आहेत. अत्यंत उत्साह, प्रसन्नता, मृदुता, प्रेम, नम्रता या दैवी संपत्तीनी युक्त असे त्यांचे व्यक्तिमत्त्व आहे. या वयातही अनेक सद्ग्रंथ प. पू. काडसिद्धेश्वर स्वामी यांच्या प्रेरणेने लिहीत आहेत. सोपी भाषा, भाषेला साधनेची जोड असल्याने ती प्रासादिकच आहे.

सदरच्या ग्रंथातून नचिकेताची जिद्द व चिकाटी अंगी बाणावी व ''उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधन ।' हा ध्येयमंत्र अनेकांना प्रेरणा देऊन उचित ध्येयापर्यंत घेऊन जावा हीच सदिच्छा!

**– प्राचार्य ह.भ.प. इंद्रजीत देशमुख**
कोल्हापूर

# लेखकाचे मनोगत

ईशकृपेने व परमपूज्य स्वामीजींच्या कृपाशीर्वादाने दशोपनिषदांपैकी पहिले 'ईशावास्योपनिषद' व दुसरे 'केनोपनिषद' प्रकाशित झाले. कठोपनिषद हे त्यातील तिसरे महत्त्वाचे उपनिषद आहे. १२० मंत्रांचे हे उपनिषद विस्ताराने पहिल्या दोन उपनिषदांपेक्षा थोडे मोठे असले तरी ब्रह्मविद्येचे सर्वांत स्पष्ट आणि सुबोध वर्णन असणारे हे उपनिषद नचिकेत आणि मृत्युदेव यांच्या संवादामुळे व शैलीमुळे रसाळ व रंजक असे झाले आहे. या जगातील दुःखांचे आणि अनिष्टांचे मूळ कारण अविद्या आणि अज्ञान हे आहे. मनुष्य स्वतःच, 'मी' म्हणजे देह आहे असे समजत असल्यामुळे, आसक्ती व अहंभाव याकारणाने भवसागरात दुःख भोगतो. वास्तविक 'मी' हा त्या नित्य, शाश्वत, शुद्ध, बुद्ध व सच्चिदानंद असणाऱ्या शुद्ध सत्य तत्त्वाचा अंश आहे. त्या परतत्त्वाचा अंश प्रत्येकाच्या हृदयात वास करीत आहे. त्या आत्मतत्त्वाला समजणे आणि त्याची प्रत्यक्ष अनुभूती घेणे यालाच ज्ञान म्हणतात. अशा आत्मज्ञानाची मागणी नचिकेताने यमराजाकडे केली व यमराजाने ही आत्मविद्या अतिशय सोप्या शैलीत त्याला स्पष्ट करून सांगितली. हाच या कठोपनिषदाचा विषय आहे.

आत्मसुखाचे उगमस्थान म्हणजे आपले आत्मस्वरूपच होय. वास्तविक हे आत्मसुख मनुष्यास सदोदित प्राप्त आहे. ते कोठून बाहेरून प्राप्त करावयाचे नाही. शुद्ध चैतन्य आत्मा देहात जोपर्यंत प्रकाशत असतो तोपर्यंत देहाला हालचाली करता येतात. पण अज्ञानामुळे या दिव्य ज्योतीचा प्रकाश आपणास घेता येत नाही म्हणून कठोपनिषदाचा जगाला दिव्य संदेश असा आहे, 'उत्तिष्ठत! जाग्रत! प्राप्य वरान्निबोधत!' 'उठा, जागे व्हा. साक्षात्कारी महापुरुषांच्या चरणापाशी बसून हे आत्मज्ञान समजून घ्या व त्याची अनुभूतीही करून घेऊन अज्ञानाचा नाश करा.' संपूर्ण कठोपनिषदामध्ये उपनिषदकारानी मनुष्याच्या मनबुद्धी, इंद्रिये अशा आंतरिक स्वरूपाचे वर्णन समग्रतेने केले आहे. अतिशय प्रसिद्ध अशी रथाची उपमा या शरीराला देऊन इंद्रिये दमन, मनोनिग्रह याचा मार्ग सांगितला आहे. संपूर्ण शरीर म्हणजे एक रथ आहे व या शरीराचा

मालक म्हणजे रथी हा आत्मा आहे, बुद्धीरूपी सारथीच्या हातात मनोरूपी लगाम आहे. हा लगाम दहा इंद्रियरूपी घोड्यांना ताब्यात ठेवायचे की नाही याचा विवेक करतो. असा हा रथ श्रेय मार्गाने कसा न्यावा व याच जन्मात या देहाचे सार्थक कसे करावे. याचा मार्ग कठोपनिषदात यमराजानी वर्णन केला आहे. मृत्यूविषयक तत्त्वज्ञानाचा सारांशही यात आहे.

असे हे मौलिक उपनिषद परमपूज्य अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामींच्या प्रेरणेने प्रकाशित होत आहे. सामान्यातल्या सामान्य माणसापर्यंत हे मौलिक तत्त्वज्ञान पोहोचले पाहिजे म्हणून सोप्यात सोप्या पद्धतीने ते मांडावे अशी त्यांनी इच्छा व्यक्त केली. म्हणून मी अतिशय सुलभ पद्धतीने हे समजावण्याचा प्रयत्न केला आहे.

या उपनिषदातील शुद्ध पवित्र विचारांनी आपले जीवनसुद्धा परिपूर्ण व्हावे या शक्तिशाली विचारांनी सर्वांचा नैतिक, आध्यात्मिक व भौतिक असा सर्वांगीण विकास व्हावा, आत्मतृप्त करणाऱ्या या ज्ञानाने आपले जीवन समृद्ध व्हावे, परमपूज्य स्वामींनी सुपूर्त केलेला हा ज्ञानयज्ञ याचसाठी आहे. ज्ञानानेच मनुष्याच्या जीवनात शांती, सुख, समाधान प्राप्त होते. या ज्ञानयज्ञातील कठोपनिषद ही माझी अल्पशी समिधा आहे.

हे पुस्तक निर्माण करण्यात सहभागी असणाऱ्या मुद्रक वगैरे सर्व घटकांचे मी आभार मानतो. या ग्रंथासाठी ग्रंथदान करणाऱ्या दानशूर व्यक्तींची कृतज्ञता मानणे माझ्या शब्दशक्तीच्या पलीकडचे आहे. प्रस्तावना लिहिणारे माझे सुहृद प्रसिद्ध विचारवंत व श्रेष्ठ साधक प्राचार्य इंद्रजीत देशमुख यांचेही मी येथे आभार मानतो.

**- प्रा. द. ना. दुभाषी**

रत्नोदय सोसायटी,
२४६ अ/ई, नागाळा पार्क, कोल्हापूर.
(फोन : (०२३१) २६५१०४४
९६१२३८१

# ग्रंथदानी परीयच

दातृत्व हा एक अलंकार आहे. म्हणूनच भारतीय संस्कृतीत दानाला खूप मोठे महत्त्व आहे. दाता भेटणे ही एक दुर्मिळ गोष्ट आहे. मठाधिपती प.पू. अदृश्य स्वामीजीनी जन्मशताब्दी वर्षानिमित्त अनेक संकल्प सोडले आहेत हे आपणा सर्वांना ज्ञात आहेच. ब्रम्हलीन काडसिद्धेश्वर स्वामी महाराजांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त १०० पुस्तके प्रकाशित होत आहेत. या पुस्तकांच्या प्रकाशनासाठी अनेक दानशूर व्यक्ती पुढे येत आहेत. **कठोपनिषद** स्मृती सौरभ - २५ या पुस्तकासाठी श्री. अनिल नाईक यांनी अर्थदान केलेले आहे.

अनिल नाईक हे आपले वडील कै. कृष्णात दत्तात्रय नाईक यांच्या स्मरणार्थ अर्थदान करत आहे. त्यांचे मूळ गांव कणेरी असल्याने ते नेहमीच मठाच्या संपर्कात असतात. नाईक कुटूंबाचे सारेजण मठाचे निस्सिम भक्त आहेत. ब्रम्हलीन काडसिद्धेश्वर स्वामी महाराजापासून ते अदृश्य स्वामीजीपर्यंत ही नाईक मंडळी सतत मठाच्या सेवेत आहेत. सद्या मठावर विविध विकासकामे सुरु आहेत. या कमासाठी अनिल नाईक नेहमी स्वामीजींना मदत करत आहेत. ते राजकीय पुढारी आहेत. तरीही स्वामीजींवर त्यांची अतूट श्रद्धा आहे. त्यांचे बंधू शिवु, पदु, कांतु हे तर नेहमीच मठावर असतात. अशा प्रकारे स्वामीजींवर अपार श्रद्धा असणारे हे कुटूंब अतिशय निगर्वी आणि सात्विक आहे. त्यांच्या वंशावळीचा वटवृक्ष खालीलप्रमाणे आहे.



# अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| १. | प्रस्तावना | |
| २. | लेखकाचे मनोगत | |
| ३. | वेद व वेदान्त (उपनिषदे) | १ |
| ४. | उपनिषदांचे स्वरूप व महत्त्व | ६ |
| ५. | कठोपनिषदाचे स्वरूप व माहात्म्य | ९ |
| ६. | शान्तिपाठ | ८ |
| ७. | प्रथमाध्याय | १३ |
| | १. प्रथमा वल्ली / १३ | |
| | २. द्वितीया वल्ली / ४१ | |
| | ३. तृतीया वल्ली / ६८ | |
| ८. | द्वितीयाध्याय | ८४ |
| | १. प्रथमा वल्ली / ८४ | |
| | २. द्वितीया वल्ली / ९९ | |
| | ३. तृतीया वल्ली / ११२ | |
| ९. | संदर्भ ग्रंथ | १२७ |

# वेद व वेदान्त (उपनिषदे)

भारतीय तत्त्वज्ञानात वेदांचे स्थान अपूर्व आहे. वेद हे अति प्राचीन वाङ्मय आहे, ते अपौरूशेय म्हणून गणले जातात. वेद म्हणजे भगवंताचे निःश्वास आहेत असे म्हटले जाते व उपनिषदे म्हणजेच वेदान्त होय. उपनिषदे वेदांच्या शेवटी म्हणजे अंत्यभागी येतात म्हणून ती वेदान्त होत. उपनिषदांना वेदान्त म्हणण्यात आणखीही एक औचित्य आहे. वेदांनी ज्याचा अंत पाहिला आहे अथवा अंतिम ठाव घेतला आहे असे ज्ञान म्हणजे वेदांचे सारभूत ज्ञान उपनिषदात संग्रहित आहेत म्हणून ती वेदान्त होत.

वेदांच्या रचनेचा काळ निश्चित कोणता याबद्दल संशोधकांत एकमत नाही. साधारणपणे ख्रिस्तपूर्व सुमारे ५००० वर्षे या काळापासून ते ख्रिस्तपूर्व २००० सालापर्यंत वेदांची रचना झाली असे मत स्वीकारार्ह वाटते. मानव जातीच्या सर्वांत प्राचीन ग्रंथांपैकी एक म्हणून वेदांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. तत्कालीन जीवन पद्धतीचे वर्णन वेद-वाङ्मयात घडते म्हणून त्याचे ऐतिहासिक महत्त्वही अनन्यसाधारण आहे.

वेदांची मौखिक परंपरा आजही भारतात अस्तित्वात आहे. हजारो वर्षांपूर्वी वेद सूक्तांचे उच्चारण ज्या पद्धतीने केले गेले अगदी त्या पद्धतीनेच वेदांचे पठन करणारी मंडळी संपूर्ण भारतात अनेक ठिकाणी आढळतात. त्यांच्या स्वरामध्ये कुठेही फेरफार आढळत नाही. असा हा क्रम पिढ्यान्‌पिढ्या चाललेला आहे. हे एक जगातील महदाश्चर्य म्हणावयास हरकत नाही. वेदांची परंपरा ऐकण्यावर म्हणजे श्रवणावर आधारलेली असल्याने त्यांना 'श्रुती' असेही म्हणण्यात येते. भारतात जे अनेक पंथ, संप्रदाय आहेत त्यांची गंगोत्री ही वेदान्त आहे. ज्या अनेक धर्मकल्पना भारतातल्या विविध प्रांतांत आढळतात त्यातील बहुतेकांची बीजे वेदान्तात सापडतात.

वेद चार आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद ही त्यांची नावे आहेत. महाराष्ट्रातील सर्व संतांनी वेदांना माऊलीच्या स्वरूपात पाहिले आहे. संत तुकाराम म्हणतात,

**वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा ।**
**इतरानी वाहावा भार माथा ।।**

तर ज्ञानेश्वर माऊली सोळाव्या अध्यायात वेदांची महती सांगताना म्हणतात,

**ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।**
**तरी कें आहे अनिष्टा । भेटणें गा ।। (अ.१६-४६१)**
**पैं अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती ।**
**नाहीं श्रुतीपरौती । माउली जगा ।। (अ.१६-४६२)**

**अर्थ** - 'अर्जुना, याप्रमाणे केवळ वेदांच्या ठिकाणी जर एकनिष्ठ झाले तर अकल्याणाची गाठ कोठून पडणार. (४६१) अकल्याणापासून काढणारी व हित देऊन वाढविणारी अशी श्रुतीशिवाय दुसरी कोणी माऊली जगात नाही. (४६२)

श्री ज्ञानेश्वर महाराज वेदांना तीनही जगांची माऊली असे म्हणतात. ज्याला स्वतःचे हित साधावयाचे असेल त्याने वेदांच्या आज्ञेच्या बाहेर जाऊ नये. गुरूंच्या वचनावर विश्वास ठेवून शिष्य जसा आत्मकल्याण करून घेतो तसे या वेदावर विश्वास ठेवून, श्रद्धेने नतमस्तक होऊन वेदांच्या तत्त्वज्ञानाचे आचरण करावे, कारण ही वेदमाता अहितापासून काढणारी, हित करून वाढविणारी अशी आहे. ही श्रुती जीवाचे ब्रह्माशी ऐक्य करते. म्हणून हिची हेळसांड कोणी करू नये. वेदांविषयी तक्रार करताना ज्ञानेश्वर माऊलीने एक उणीव मात्र दाखवली. ते म्हणतात की, वेद हे कृपण आहेत, कारण ते तीन वर्णांच्याच कानी लागले असे जरी असले तरी त्यांनी वेदांचे माहात्म्य नाकारले नाही. म्हणून ते एका ठिकाणी म्हणतात,

**जरी वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सूचिले ।**
**तऱ्ही आपण हित आपुलें । तेंचि घेपे । (अ.२-२६०)**

**अर्थ** - वेदांनी जरी खूप तत्त्वज्ञान सांगितले असले तरी हे अर्जुना, जेवढे काही आपल्या हिताचे असेल तेवढे घ्यावे. कारण ज्याप्रमाणे सूर्योदय होताच अनेक रस्ते दिसत असतात, पण सगळ्या रस्त्यांनी चालता येत नाही. एकच रस्ता निवडावा लागतो. किंवा पृथ्वीवर खूप पाणी आहे, पण आपली गरज व तहान जेवढी असेल तेवढे पाणी आपण घेतो. त्याप्रमाणे जे ज्ञानी आहेत ते वेदार्थाचा विचार करून जेवढे इष्ट व हिताचे आहे तेवढे ह्या वेदरूपी सागरातून ग्रहण करतात, असा ज्ञानेश्वर माऊलींचा वेदाविषयी अभिप्राय आहे. आदिशंकराचार्यांपासून ते आजतागायत वेदांचा वेध घेण्याचा प्रयत्न अव्याहत चालू आहे.

वेदांच्या वर उल्लेखिलेल्या चार प्रमुख वेदांची रचना विशिष्ट पद्धतीने झाली आहे. प्रत्येक वेदाचे १) संहिता २) ब्राह्मणे ३) आरण्यके व उपनिषदे असे तीन भाग पाडलेले आहेत. संहितेत मुख्यतः देवदेवतांच्या स्तुतीपर मंत्र



असतात. ब्राह्मण ग्रंथात प्रामुख्याने यज्ञक्रियांचे वर्णन येते. याशिवाय तो यज्ञ यथाविधी का व कसा करावा, या संबंधीची चिकित्सा असते. शेवटी आरण्यके आणि उपनिषदे यात तत्त्वविचार हाच प्रमुख विषय म्हणून येतो. ब्राह्मण ग्रंथातील विषयाकडून उपनिषदातील विचाराकडे वळत असताना आरण्यके हा एक मधला टप्पा आहे. म्हणून ब्राह्मणातील यज्ञकर्मकांडाकडून उपनिषदातील ज्ञानकांडाकडे जाण्याचा पूल या दृष्टीने आरण्यकाकडे पाहता येईल, कारण आरण्यके व ब्राह्मणे तसेच आरण्यके व उपनिषदे यांच्यातील सीमारेषा अस्पष्ट आहे. आरण्यके म्हणजे वानप्रस्थाश्रमाला साजेसे निवृत्तीप्रधान विचार. उपनिषदातील विचार हे अति प्रगल्भ आहेत, तर आरण्यकामधील विचार हे या विचारांची पूर्व बैठक तयार करणारे आहेत.

ऋग्वेद व अथर्ववेद हे दोन अत्यंत महत्त्वाचे वेद. सामवेदातील पुष्कळसा भाग ऋग्वेदातून घेतला आहे. म्हणून ऋक्, साम आणि यजुस असे तीनच वेद सुरुवातीला मानले जात असत. कालांतराने अथर्ववेदाला मान्यता मिळून चार वेद झाले.

ऋग्वेदातील धर्मभावना, देवतेपुढे विनम्र होऊन तिच्या कृपाप्रसादाने इष्ट गोष्टी प्राप्त करून घ्याव्यात अशी आहे. तर अथर्ववेदाचा भर यातुविद्येवर म्हणजे जादूटोण्यावर आहे. मंत्रांच्या सामर्थ्याने व शास्त्रनुरूप ठराविक कर्मकांड आचरल्यास देवतांना आपल्याला हव्या त्या गोष्टी द्याव्या लागतात. त्यातही दोन प्रकारचे विचारप्रवाह आहेत. काही मंत्र हे जारणमरण व विघातक गोष्टी करण्यासाठी आहेत, तर काही मंत्र हे मंगलमय कामना ठेवून कल्याणकारी असे आहेत. ऋग्वेद आणि अथर्ववेद यातील संहिता भागात इंद्र, अग्नी, वरुण, मरुत, सोम, मित्र अशा अनेक देवदेवतांची स्तवने येतात. यांनाच सूक्ते किंवा मंत्र म्हणतात. यज्ञात हवी अर्पण करून आणि स्तुतिस्तोत्रे गाऊन देवतांना प्रसन्न करावे व आपणास इष्ट असलेल्या गोष्टी त्यांच्या कृपाप्रसादाने मिळवाव्यात यासाठी सूक्तांची योजना आहे. वरुण, इंद्र व विष्णू या प्रमुख देवता जरी असल्या तरी अनेक देवदेवतांचे वर्णन या ग्रंथातून केले आहे. मानवी संस्कृतीच्या या कालखंडात वैदिक लोक बहुदेवतावादी होते. निसर्गातील भव्य दिव्य व चमत्कृतीपूर्ण अशा प्रत्येक शक्तीमागे एक एक देवता आहे, अशी त्यांची धारणा होती. पुढे पुढे या अनेकत्वातून एकत्वाकडे पाहण्याचा दृष्टिकोनसुद्धा वेदकाळातील उत्तरार्धात निर्माण झाला. सुरुवातीला देवतांची स्तुतिस्तोत्रे मनोभावे गाऊन त्यांच्याकडून इष्ट गोष्टी मागून घ्याव्यात, एवढाच धर्माचा आशय होता. त्या काळी मूर्ती आणि मंदिरे नव्हती. पुढे यज्ञ करून अग्नीमार्फत देवतांना हवी द्रव्ये पोचवणे असे स्वरूप धर्माने घेतले, म्हणून

ब्राह्मण काळात यज्ञीय कर्मकांड हाच धर्म बनला. यज्ञ हा सामाजिक जीवनाचा केंद्रबिंदू ठरला. त्यामुळे समाजातील निरनिराळ्या थरांना यज्ञातील विविध कामे वाटून दिली जाऊ लागली. त्यामुळे या काळात यज्ञांना अवास्तव महत्त्व आले. चार वर्णांच्या आणि चार आश्रमांच्या कल्पनेची जोपासनाही याच ब्राह्मण काळात झाली.

सुरुवातीच्या काळात ऋषींची वृत्ती बहिर्मुखी होती. पण जसजसा विचारांचा विकास होत गेला तसतसा अंतर्मुख होण्याकडे व विश्वाचा सूक्ष्म विचार करण्याकडे कल होऊ लागला. यज्ञातील कर्माचे अवडंबर जाऊन ब्रह्माच्या, आत्म्याच्या शक्तीचा शोध सुरू झाला. चिंतनावर भर देऊन विश्वातील दडलेल्या शक्तीचा सूक्ष्म विचार होऊ लागला. ब्राह्मण काळात यज्ञरूपी बाह्योपचारावर जे सर्वस्वी लक्ष होते ते आता अंतर्यामातील ऊर्जेच्या स्थिती आणि गतीवर केंद्रित होऊ लागले व उपनिषद काळात हा तत्त्वविचार अतिशय समृद्ध व परिपूर्ण झाला.

×××



# उपनिषदांचे स्वरूप व महत्त्व

विश्वधर्म व प्रेमाचा संदेश देणारे उच्चतम तत्त्वज्ञान असणारी उपनिषदे संख्येने बरीच (२३९) असली तरी महत्त्वाची उपनिषदे म्हणून एकूण अकरा उपनिषदांचा उल्लेख केला जातो. ती ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डूक्य, तैत्तिरीय, छान्दोग्य, ऐतरेय, बृहदारण्यक व श्वेताश्वतर अशी आहेत. शंकराचार्यांच्या भाष्यातून याच महत्त्वाच्या उपनिषदांतील वचने उद्धृत केली आहेत. उपनिषद या शब्दाची फोड उप + नि + सद अशी करता येते. सद म्हणजे बसणे, उप आणि नि हे उपसर्ग लावल्याने, 'गुरूच्या फार जवळ (उप) आणि निष्ठापूर्वक (नि) बसणे' असा अर्थ होतो. वेदातील पहिल्या दोन भागांस कर्मकांड व शेवटच्या दोन भागांस ज्ञानकांड असे म्हटले जाते. या उपनिषदातील काही भाग श्लोकबद्ध आहे व बराचसा भाग गद्यात्मक आहे. उपनिषदामध्ये बराचसा भाग संवाद पद्धतीने सांगण्यात आला आहे. यम आणि नचिकेत (क), आरुणी आणि त्याचा पुत्र श्वेतकेतु (छा), इंद्र आणि प्रजापति (छा), याज्ञवल्क्य आणि त्याची पत्नी मैत्रेयी (बृ) इत्यादी संवाद प्रसिद्ध आहेत. बुद्धीने शोध घेत घेत काही सत्य प्रतिपादन करावे या वृत्तीतून उपनिषदांचा जन्म झाला. एका व्यक्तीने सलगपणे निर्माण केलेले वाङ्मय असे उपनिषदांचे स्वरूप नाही. भिन्नभिन्न काळात निरनिराळ्या ऋषींना स्फुरलेले विचार आणि त्यांना आलेल्या अनुभूती यांचे उपनिषदांत कथन केलेले आहे. प्रत्येक उपनिषदात व्यक्तीला अमृततत्त्वाची प्राप्ती कशी होईल याचीच चर्चा प्रामुख्याने आहे. आकर्षक असणाऱ्या व मोह पाडणाऱ्या नाशवंत प्रेय गोष्टींनी मनुष्याला अखंड सुख प्राप्त होत नाही. पण आत्मज्ञानाचे श्रेय प्राप्त झाल्यास त्याला अमृततत्त्व किंवा अखंड आत्मसुख प्राप्त होते, याबद्दल सर्व उपनिषदांत एकवाक्यता आहे. व्यक्तीच्या आंतर्यामी असलेला आत्मा हाच विश्वाचे आधारभूत तत्त्व जे ब्रह्म ते होय, याबद्दल सर्व उपनिषदांत एकवाक्यता दिसते.

वैदिक धर्म आणि वैदिक तत्त्वज्ञान या दोहोंचे उपनिषदे हे आधारभूत ग्रंथ आहेत. खरा धर्म म्हणजे आत्मज्ञान हे तत्त्व या उपनिषदांनी प्रभावीपणे मांडले आहे.

वेद काळ सोडून उपनिषद काळाकडे आपण जेव्हा पाहतो त्या वेळी एक गोष्ट प्रामुख्याने समजते ती ईश्वर जिज्ञासेपेक्षा आत्म जिज्ञासेकडे तत्त्वज्ञानी

आचार्यांचे मन अधिक गुंतले होते. वैदिक संहिता ग्रंथामध्ये सृष्टीतील निरनिराळ्या शक्ती या देवता आहेत असे मानून त्यांचे स्तवन करणे हे प्रमुख उद्दिष्ट होते, पण या उपनिषद काळात ईश्वरतत्त्वाचा असा वरवरच्या बाह्यदृष्टीने विचार न करता या सृष्टीच्या मुळाशी आणि त्या सृष्टीस आधारभूत असे कोणते मूलतत्त्व आहे याचा विचार शास्त्रीय दृष्टीने केला गेला. म्हणूनच वैदिक साहित्यातील प्रार्थना, ईश्वराविषयीची अवास्तव भीती, बहुईश्वरवाद, परमेश्वराचे स्तुतिपाठ अशा स्वरूपाचे वर्णन उपनिषदातून येत नाही. उलट आत्मा, ब्रह्म, परब्रह्म, आपरब्रह्म, आत्मा आणि ब्रह्म यांचे ऐक्य, कर्मसिद्धांत व मृत्यूनंतरची स्थिती, एकेश्वरवाद अशा प्रकारचे आत्मज्ञानाचे विषय उपनिषदामध्ये विशद केले आहेत. म्हणून उपनिषदे ही आत्मज्ञान सांगणारी व बहिर्मुखता सोडून अंतर्मुखतेला स्थान देणारी व बुद्धिवादी तात्त्विक विचारसरणी अवलंबणारी श्रेष्ठ ग्रंथसंपदा ठरली. म्हणूनच 'ज्याचे ज्ञान झाले असता बाकी सर्वांचे ज्ञान होते असे तत्त्व कोणते?' असा मुण्डक उपनिषदातील प्रश्न अन्य उपनिषदांतही पुनःपुन्हा विचारलेला दिसून येतो. उपनिषद काळातील ऋषींना ईश्वरप्राप्तीपेक्षा आत्मज्ञानाची ओढ अधिक होती.

अशा आत्मज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव कसा घेता येईल व त्यासाठी कोणत्या प्रकारच्या नीतीची, चारित्र्याची गरज आहे, याचा शोध त्यांनी घेतला. कठोपनिषदामध्ये नचिकेताने यमाला या आत्मज्ञानासंबंधी जे प्रश्न विचारले ते प्रश्न सर्व उपनिषदामध्ये पुनःपुन्हा आले आहेत. 'मनुष्य मृत्यूनंतर कोठे जातो?' 'आत्मा म्हणजे काय?' 'जगामध्ये सत्य गोष्ट कोणती?' 'बुद्धीच्या साहाय्याने आत्म्याचे स्वरूपज्ञान कितपत शक्य आहे?' अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे तत्त्वज्ञान व अनुभूतीद्वारे करणे हे उपनिषदांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. बृहदारण्यक उपनिषदात जनक राजाने याज्ञवल्क्य ऋषीस विचारले की, हा आत्मा कोणाकडून प्रकाशला जातो? तो आहे असे ज्ञान कोणाला होणार? त्याच्या अस्तित्वाचा पुरावा कोठून आणावयाचा? अशा प्रश्नांना याज्ञवल्क्याने उत्तर दिले की, जेव्हा सूर्य, चंद्र, अग्नी इत्यादी प्रकाशक अस्तास जातात तेव्हा हा आत्मा प्रकाशतच असतो, कारण तो स्वयंज्योतीही आहे. त्याचे अस्तित्व स्वसंवेद्य आहे. स्वप्न व जागृत अवस्थेत हा अनेक विषयांचा अनुभव घेत असला तरी तो स्वप्न व जागृती या दोहोंहूनही निराळा आहे. जेव्हा स्वप्नात विषय नसतात तेव्हा असंग आत्मा नसतो असे नाही. सुशुप्ती अवस्थेत तो आनंदाचा भोग घेतो. जागृती, स्वप्न व सुशुप्ती (गाढ झोप) या तिन्ही अवस्थांतील अनुभवांना तो साक्षी असतो. असा हा आत्मा हीच सर्वांत प्रियतम अशी वस्तू आहे असे याज्ञवल्क्य आपली पत्नी मैत्रेयी हिला सांगतात. मनुष्याला



जी कोणतीही गोष्ट प्रिय असते ती त्या त्या गोष्टीकरता नसून, स्वतःकरता म्हणजे आत्म्याकरता प्रिय असते, हे त्रिकालाबाधित सत्य त्यांनी आपल्या पत्नीला सांगितले. ते महान सत्य असे 'न वा अरे, सर्वस्य कामाय सर्वं प्रियं भवति, आत्मनस्तु कामाय्र सर्वं प्रियं भवति ।' पती प्रिय असतो तो पतीच्या काही कामनेसाठी नव्हे तर आपल्या स्वतःसाठी, पुत्र प्रिय असतो तर पुत्रासाठी नव्हे तर आपल्यासाठी, म्हणून साऱ्या आनंदाचा व सुखाचा जिवंत झरा हा आत्माच आहे. म्हणून अशा आत्म्याचे चिंतन, मनन, निदिध्यासन करावे असे उपनिषदांचे म्हणणे आहे. कारण अशा आत्म्याला जाणून घेतल्यानंतर जाणावयाचे काही शिल्लक राहत नाही, कारण आत्मा हे ब्रह्माचेच स्वरूप आहे.

सर्व उपनिषदांत ब्रह्माच्या या स्वरूपाविषयी खूप सांगितले आहे. ब्रह्म हे आनंदरूप म्हणून सांगितले आहे. छान्दोग्य उपनिषदात त्याचे स्वरूप 'सत्' असे केले आहे. आरुणी आपला पुत्र श्वेतकेतु याला म्हणतो, 'पुत्रा प्रथमतः हे केवळ सत् होते. त्या सत्‌मध्ये जाणिवेचे असे स्फुरण झाले की आपण बहू व्हावे म्हणून ही नामरूपांची सृष्टी निर्माण झाली. तेच सत् तत्त्व सर्वत्र भरून राहिले आहे. ते आत्मस्वरूप आहे व तो आत्मा तूच आहेस.' या उपनिषदात, 'तत्त्व मसि' (ते तू आहेस) हे वाक्य श्वेतकेतुला अनेक वेळा उच्चारिले आहे. अद्वैत वेदान्त मतातील चार महावाक्यांपैकी हे एक आहे. सर्व उपनिषदांमध्ये ब्रह्माची दोन प्रकारची वर्णने येतात. ब्रह्म अविकारी, निर्गुण, भेदरहित आहे. त्याचप्रमाणे ते विकार पावून जग निर्माण करणारे, बहू होणारे आणि शुभ गुणांनी युक्त आहे, असेही म्हटले आहे.

ब्रह्म निर्गुण आहे असा विचार उपनिषदांतून जागोजागी व्यक्त केला आहे, असे असूनसुद्धा त्याच्या विकारीत्वाचेसुद्धा वर्णन आहे. सगुण-निर्गुण वादात श्री शंकराचार्यांनी अशी बाजू घेतली आहे की, निर्गुण ब्रह्म हे खरे अंतिम तत्त्व अथवा परब्रह्म होय. त्याचे ज्ञान ही पराविद्या होय. अविद्येमुळे अथवा मायेमुळे त्याच्यावर गुणांचा आरोप होतो. हे सगुण ब्रह्म उपासनेला उपयोगी असल्याने उपनिषदांत त्याची वर्णने येतात अशी एक बाजू सांगितली जाते. अशा दोन्ही प्रकारांची वर्णने उपनिषदांत असली तरी जग हे ब्रह्माधारित आहे. ब्रह्माकडून स्वतंत्र असे अस्तित्व नाही या मुद्यावर मात्र उपनिषदांत मतभिन्नता नाही. ब्रह्म जगात ओतप्रोत आहे, ब्रह्माच्या आधारानेच जग आहे याबद्दल सर्व उपनिषदांत मात्र एकवाक्यता आहे. 'सर्व खलु इदं ब्रह्म', 'अयम् आत्मा ब्रह्म', तत् त्वम् असि', 'अहं ब्रह्म अस्मि' ही महावाक्ये उपनिषदातून उद्‌धृत झाली आहेत. मुण्डक उपनिषदात म्हटले आहे की, त्या परमसत्याचे

दर्शन झाले म्हणजे हृदयातील सर्व संशय, जळमटे निघून जातात. आत्मदर्शन झाल्यावर हृदयग्रंथी तुटतात, संशय विरून जातात, अमृततत्त्व व अभयत्व मिळते व जीवन सार्थकी लागते, असा महिमा उपनिषदातून व्यक्त झाला आहे. असा आत्मज्ञान झालेला मनुष्य सर्व भूतांना आपल्या ठिकाणी पाहतो व आपणास सर्वांच्या ठिकाणी पाहतो. अशा पुरुषास कोणताही मोह व कसलाही शोक राहत नाही, असे ईशोपनिषदात म्हटले आहे. अशा उपनिषदांनी मनुष्याचे परमप्राप्तव्य आत्माच आहे व आत्मकाम होणे यातच त्याची कृतकृत्यता आहे असे प्रतिपादिले आहे. कृतकृत्य ही नैतिक संकल्पना उपनिषदात आली आहे. कृतकृत्य म्हणजे ज्याने आयुष्यात आपली कर्तव्ये पूर्णपणे पार पाडली आहेत असा 'सत्यम् वद धर्मचर, मातृदेवो भव, पितृदेवो भव' अशा प्रकारची नैतिक तत्त्वे उपनिषदांनी आदर्श जीवनासाठी सांगितली आहेत.

मृत्यूनंतर कोणता जन्म मिळावयाचा हे या जन्मातील कर्माने ठरते. पुनर्जन्म हा अपरिहार्य आहे असे सांगून मृत्यूनंतरच्या स्थितीचे वर्णनही उपनिषदांनी केले आहे. गुरुदेव रानडे यांनी उपनिषदांची स्तुती करताना म्हटले आहे, 'उपनिषद साहित्यातील हे तत्त्वज्ञान देशोदेशीच्या साधकांच्या भौतिक, तात्त्विक आणि धार्मिक आकांक्षा पूर्ण करणारे असून, आत्मसाक्षात्काराच्या अनुभूती संपन्न पायावर ते उभारलेले असल्याने धर्म, जाती, संप्रदाय आदी क्षुद्रमतभेदांचा छेद घेणारी विश्वात्मकता या तत्त्वज्ञानामध्ये आहे. उपनिषदांर्तगत अनुभूतीप्रधान तत्त्वप्रणालीमध्ये धर्म, तत्त्वज्ञान आणि भौतिकशास्त्रे या त्रयींची बेमालूम सांगड घालण्यात आली आहे. बुद्धी आणि अनुभूती या दोहोंच्या साहाय्याने यांचे अध्ययन केले असता आधुनिक काळातही हे साहित्य प्रेरक ठरेल.'

आजही उपनिषदांचा अभ्यास जर्मनीसारख्या प्रगत देशात अखंडपणे सुरू आहे. आधुनिक शास्त्रांची प्रगती या औपनिषदिक तत्त्वज्ञानास पोषक आहे. भौतिक प्रगतीने मनुष्याला सर्व काही दिले आहे, पण त्याची मनःशांती मात्र तो हरवून बसला आहे. अशा काळात उपनिषदांचे हे तत्त्वज्ञान माणसाला आत्मशांतीचा व प्रसन्नतेचा मार्ग निश्चित दाखवू शकते.

×××



# कठोपनिषदाचे स्वरूप व माहात्म्य

कठोपनिषद हे दशोपनिषदांपैकी तिसऱ्या क्रमांकाचे अत्यंत महत्त्वाचे असे उपनिषद आहे. श्रीमद् श्री शंकराचार्यांनी यात दहा उपनिषदांचा क्रम खालील श्लोकात ग्रथित केला आहे.

**'ईश-केन-कठ-प्रश्न-मुंड-मांडुक्य-तैत्तिरिः ।**

**ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यकं तथा ।।'**

अशा प्रकारे कठोपनिषद हे अतिशय काव्यमय व श्रेष्ठतम तत्त्वज्ञान असलेले एक महत्त्वाचे उपनिषद आहे. मृत्युदेवता यम आणि आत्मज्ञानाची उत्कट तळमळ असलेला आदर्श साधक नचिकेत यांच्यामधील संवादाचे वर्णन या उपनिषदात आले आहे. ऋषिकुमार नचिकेतच्या मृत्यूसंबंधीच्या नानाविध प्रश्नांना उत्तरे देताना मृत्युदेवतेने जे अलौकिक तत्त्वज्ञान सांगितले ते या उपनिषदात ग्रथित केले आहे. या संवादात यमराजांनी नचिकेताला श्रेय आणि प्रेय, आत्मविद्या, आत्मलाभाची साधना, मोक्ष इत्यादी महत्त्वपूर्ण विषयांचा उपदेश केला आहे. मनुष्य जीवनाचे अंतिम साध्य हे आत्मज्ञान करून घेण्यात आहे. या आत्मज्ञानानेच अंतिम शाश्वत सुख प्राप्त होत असते. हे सुख प्राप्त करण्यासाठी यमराजानी नचिकेताला आध्यात्मिक जीवनाचे आणि आध्यात्मिक साधनेचे रहस्य यात उलगडून दाखविले आहे.

**'उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान् निबोधत ।'**

'उठा, जागे व्हा आणि थोर आत्मदर्शी महापुरुषांना शरण जाऊन आत्मज्ञान प्राप्त करून घ्या,' असे आवाहन व संदेश या उपनिषदाने केला आहे. या उपनिषदात अनेक शाश्वत सत्याचे दर्शन घडते.

यम आणि नचिकेत यांच्यामध्ये मृत्यूसंबंधीचा तत्त्वज्ञानपर संवाद हा या उपनिषदाचा संपूर्ण विषय आहे. म्हणून सर्व उपनिषदात ते श्रेष्ठतम प्रश्नोत्तररूप तत्त्वज्ञान म्हणून गणले जाते. त्यामुळे या उपनिषदाची निवेदन शैली ओघवती झाली आहे. या उपनिषदाची भाषा फार संक्षिप्त आहे. गागर में सागर या न्यायाप्रमाणे छोट्या छोट्या वाक्यांतून तत्त्वज्ञानाचे सार प्रकट झाले आहे.

अनादि कालापासून मृत्यूविषयीचे गूढ प्रत्येकाला आकर्षित करते. मरणोत्तर जीवाची काय गती असते, पुनर्जन्माचे नेमके रहस्य कशात आहे, याचा सर्व

विचार या उपनिषदात केला आहे. आत्म्याचे अस्तित्व, पुनर्जन्म वाद व कर्मतःजन्म यांचे निश्चित सिद्धांत निरनिराळ्या दृष्टांतांच्या आधारे या उपनिषदाने विशद केले आहे. भगवद्गीतेत दुसऱ्या अध्यायातील आत्म्याचे अमरत्व दाखविणारा संदर्भ कठोपनिषदावर आधारित आहे. 'न जायते म्रियते.....' अशा प्रकारची शब्दरचना ही कठोपनिषदावर आधारित आहे.

कृष्ण यजुर्वेदाच्या 'कठ' नावाच्या शाखा प्रवर्तक आचार्यांनी हे उपनिषद रचलेले आहे. त्यामुळे या उपनिषदास 'कठ उपनिषद' असे नाव प्राप्त झाले. कठऋषी हे कृष्ण यजुर्वेदाचे आद्य प्रवर्तक वैशम् पायन ऋषींच्या शिष्यांपैकी एक आहेत. त्यांच्या अलौकिक कर्तृत्वामुळे त्यांच्या अनुयायांची स्वतंत्र शाखा कठ नावाने प्रसिद्धीस आली.

या उपनिषदातील अध्याय हे अनेक 'वल्ली' (उपअध्याय)मध्ये विभाजित झाले आहेत. हे उपनिषद गद्य-पद्यात्मक आहे. यातील प्रारंभाची काही वाक्ये गद्य स्वरूपात व उर्वरित संपूर्ण भाग हा पद्यमय स्वरूपात आहे. या उपनिषदाचे एकूण दोन अध्याय असून प्रत्येक अध्यायाच्या तीन वल्ली आहेत. या कठोपनिषदाची एकूण मंत्रसंख्या शान्तिमंत्रासह १२० असून त्यातील वल्लीनुसार मंत्रसंख्या पुढीलप्रमाणे आहे : प्रथम वल्ली - २९ मंत्र, द्वितीय वल्ली - २५ मंत्र आणि तृतीय वल्ली - १७ मंत्र. असे प्रथम अध्यायात एकूण ७१ मंत्र समाविष्ट आहेत. चतुर्थ वल्ली - १५, पंचम वल्ली - १५ व षष्ठवल्ली - १९ असे एकूण ४९ मंत्र द्वितीय अध्यायात समाविष्ट आहेत.

या उपनिषदात मृत्यूने नचिकेताला तीन वर दिले याचे वर्णन सुरुवातीस आले आहे. नचिकेतला तिसऱ्या वराने मृत्यूनंतरचे ज्ञान यमाने दिले. या तिसऱ्या वरामध्ये प्रामुख्याने कठोपनिषदाचे संपूर्ण तत्त्वज्ञान सामावले आहे. हे ज्ञान देताना यमाने प्रारंभी बरीच टाळाटाळ केली. आपणास हे ज्ञान देण्याचा अधिकार नाही असे त्याने नम्रपणे सांगितले आहे. हा सूक्ष्म विषय विद्वानांनासुद्धा बुद्धिगम्य नाही त्यामुळे तो विषय सोडून नचिकेताने कोणतेही ऐश्वर्य, दीर्घायुष्य किंवा साधनसंपत्ती मागून घ्यावी याचे प्रलोभनही दाखविले, पण नचिकेत आपल्या भूमिकेवर ठाम राहिला. त्यामुळे यमाने त्याला मृत्यूविषयीचे ज्ञान दिले. हे उपनिषद मृत्यूने सांगितले आहे. मात्र यात यम शब्द कोठेही आढळत नाही. सर्व ठिकाणी 'मृत्यू' असा उल्लेख आहे. आत्मज्ञानाचे ध्येय गाठण्यासाठी इंद्रिय दमन, मनोनिग्रह व समर्थ गुरूकडून मिळालेले आत्मविषयक ज्ञान यांची आवश्यकता यात प्रतिपादिली आहे. प्रारंभी आत्मज्ञानाचे माहात्म्य सांगून श्रेय व प्रेय यातील फरक समजावला. नंतर जीवात्मा व परमात्मा यातील फरक सांगून आत्मज्ञानाचा मार्ग सांगितला. ओंकाराचे माहात्म्यसुद्धा



सांगितले. बुद्धी सूक्ष्म करण्याचे उपाय कथित करून आत्मज्ञानप्राप्तीसाठी चिंतनाची आवश्यकता सांगितली. याकरिता कठोर वैराग्य, मनोनिग्रह व आत्मजिज्ञासा यांचे महत्त्व समजावले. जीव व ब्रह्म एकच असून आत्मा हा शरीराचा प्रेरक असून तो अज, नित्य, शुद्ध, बुद्ध व सच्चिदानंद आहे हे सांगितले व शेवटी ज्ञानप्राप्तीनेच मोक्ष मिळतो हे निश्चयपूर्वक कथन केले. असे हे तत्त्वज्ञानाने ठासून भरलेले उपनिषद परमार्थ मार्गातील सर्वांना मार्गदर्शन करणारे आणि स्फूर्ती व प्रेरणा देणारे आहे, म्हणून या उपनिषदाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे.

×××

# कठोपनिषद

## शान्तिपाठ

**ओम् सह नाववतु । सह नौ भुनक्तु**
**सह वीर्यं करवावहै ।**
**तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ।**
**ओम् शान्तिः शान्तिः शान्तिः ।**

### अन्वयार्थ

**ओम सह नौ अवतु** - तो (परमात्मा) आम्हा दोघांचे रक्षण करो; **सह नौ भुनक्तु** - आम्हा दोघांनाही (ज्ञानाचा आनंद), उपभोग घेऊ दे; **सह वीर्यं करवावहै** - आपण दोघांनी एकत्र प्रयत्न करू या; **नौ अधीतम् तेजस्वि अस्तु** - आपले अध्ययन तेजस्वी असू दे; **मा विद्विषावहै** - आपण दोघे एकमेकांचा द्वेष न करोत. **ओम शान्तिः! शान्तिः! शान्तिः!** - त्रिवार शांती; त्रिविध तापांची शांती होवो!

### भावार्थ

तो परमात्मा आम्हा (आचार्य व शिष्य) दोघांचे मिळून रक्षण करो. आम्हा दोघांचे मिळून पालन करो. आम्हाला बरोबरीने (विद्यार्जनाचे) सामर्थ्य देवो. आमची विद्या तेजस्वी असो. आमच्याकडून कोणाचाही द्वेष न होवो. ओम्काररूप परमेश्वराच्या कृपेने सुख, शांती व समृद्धी असो.



# प्रथम अध्याय : प्रथम वल्ली

## वाजश्रवसाचे दान

### श्लोक

**उशन् ह वै वाजश्रवसः सर्ववेदसं ददौ ।**
**तस्य ह नचिकेता नाम पुत्र आस ।।१।।**

### अन्वयार्थ

**उशन् ह वै** - **उशन् ह वै** - स्वर्गाची इच्छा करणारा; **वाजश्रवसः** - वाजश्रवस (गौतम) याने; **सर्ववेदसम् ददौ** - यज्ञयागामध्ये आपले सर्वस्व देऊन टाकले होते; **तस्य ह नचिकेता नाम पुत्रः आस** - त्याला नचिकेत नावाचा पुत्र होता.

### भावार्थ

एकदा वाजश्रवसाने काही इच्छा मनात धरून विश्वजीत नामक यज्ञ केला व (या यज्ञात सर्व संपत्ती दान करणे आवश्यक असल्यामुळे) आपली सर्व संपत्ती त्याने दान केली. त्याला नचिकेतस् नावाचा एक पुत्र होता.

या मंत्राची सुरुवात उशन् म्हणजे कामना करणारा या शब्दाने झाली आहे. यज्ञयाग व धार्मिक विधी हे काहीतरी कामना मनात ठेवून केले जात होते. वास्तविक सर्व उपनिषदांचा उद्‌घोष असा आहे की, कामनांचा त्याग करा, वासना क्षय झाल्याशिवाय शांती प्राप्त होत नाही हा शब्द या अर्थाने अतिशय सूचक आहे. वाजश्रवसाने अशाच कामना मनात ठेवून विश्वजीत नावाचा यज्ञ प्रयत्नपूर्वक केला. अशा यज्ञात सर्वस्वाचे दान करावे लागते. त्याप्रमाणे वाजश्रवसाने सर्वस्वाचे दान केले.

या पहिल्याच मंत्रावरील भाष्याच्या सुरुवातीस आचार्य श्री शंकराचार्य आवर्जून संगतात की, 'तत्र अख्यायिका विद्यास्तुत्यर्था' - 'यम आणि नचिकेता

यांचा संवाद ही एक आख्यायिका आहे. प्रत्यक्ष यमधर्माने म्हणजे मृत्यूच्या देवतेनेच मृत्युरहस्य नचिकेताला सांगितले, अशा स्वरूपाच्या ह्या आख्यायिकेने त्या रहस्यविद्येचे महत्त्व आपल्या मनावर ठसते. एवढ्याच हेतूने ही आख्यायिका ऋषींनी उपयोजली आहे. आख्यायिकेचा आधार हा केवळ तो भाव निर्माण करण्यासाठी आहे. नाहीतर एक कोवळा पोर यमाच्या घरी जातो व तिथे यम त्याला आत्मज्ञान देतो अशा प्रकारचे कथानक हे बुद्धिवादातून विचार करू गेल्यास विश्वसनीय वाटणार नाही. त्यामुळे असा ग्रह होण्याची शक्यता आहे, की कथा ही अविश्वसनीय तर त्यातील ज्ञानही कसे विश्वासार्ह होईल? म्हणून आचार्यांनी हा यम-नचिकेता संवाद ही एक आख्यायिका आहे असे प्रथमच सांगून टाकले.

## ।। मंत्र २ ।।

**तं ह कुमारं सन्तं दक्षिणासु नीयमानासु ।**
**श्रद्धाऽऽविवेश सोऽमन्यत ।।२।।**

### अन्वयार्थ

**दक्षिणासु नीयमानासु** - यज्ञविधीच्या वेळी जेव्हा (आपल्या पित्याकडून) दिलेल्या दक्षिणा ऋत्विजाकडून नेल्या जात होत्या तेव्हा; **तं ह सन्तम् कुमारम्** - अजून बालवयात असलेल्या त्याच्या (नचिकेताच्या) हृदयात; **श्रद्धा आविवेश** - (आपल्या पित्याच्या अभ्युदयाबाबत आस्तिक्यबुद्धीने प्रवेश केला), **सः अमन्यत** - आणि त्याने विचार केला)

### भावार्थ

ब्राह्मण आपापल्या दक्षिणा नेत असता कुमार नचिकेताच्या मनात श्रद्धा (आपल्या पित्याचे हित व्हावे ही भावना) उत्पन्न झाली व तो विचार करू लागला.

आपल्या पित्याच्या कल्याणाविषयी जागृत असणाऱ्या बाल नचिकेताची आस्तिक्यबुद्धी उफाळून आली. आपला पिता याज्ञिकांना दक्षिणा देताना पाहून शुद्ध बुद्धीच्या नचिकेताला खूप आश्चर्य वाटले. आपल्या पित्याचा स्वार्थ पाहून पितृभक्त नचिकेताला पित्याच्या अकल्याणाची कल्पनाही सहन झाली नाही.



## ।। मंत्र ३ ।।
## नचिकेताची शंका

**पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिन्द्रियाः ।**
**अनन्दा नाम ते लोकास्तान्स गच्छति ता ददत् ।।३।।**

### अन्वयार्थ

**पीतोदका** - (ज्या गाई) स्वगृही अखेरचे पाणी प्यायलेल्या आहेत; **जग्धतृणा** - ज्यांनी शेवटचा घास घेतला आहे; **दुग्धदोहा** - ज्यांचे संपूर्ण दोहन झालेले आहे; **निरिन्द्रियाः** - ज्या वांझ झालेल्या आहेत; **ताः ददत्** - अशा गाईंचे जो दक्षिणा म्हणून दान करतो; **अनन्दा नाम ते लोकाः तान् सः गच्छतिः** - तो यजमान आनंदशून्य अशा लोकांत जातो.

### भावार्थ

'ज्या गाई स्वगृही अखेरचे पाणी प्यायलेल्या आहेत, ज्यांनी शेवटचा घास खाल्लेला आहे, ज्यांचे संपूर्ण दोहन झालेले आहे, आणि ज्या वांझ आहेत अशा गाई जो दक्षिणा म्हणून दान करतो तो खचितच आनंदशून्य अशा लोकांत जातो.'

विश्वजीत यज्ञामध्ये शास्त्रानुसार सर्वस्व दान करावयाचे असते. पण वाजश्रवसानी स्वतःला नको असलेल्या व ज्याचा काही उपयोग नाही अशा गोष्टी देऊन टाकणे म्हणजे सर्वस्व देणे असा सोईस्कर अर्थ लावला. त्या काळी गाय हेच लोकांचे धन होते. दक्षिणा म्हणून गोधन वाटताना वाजश्रवसानी अशा गाई वाटावयास काढल्या की, ज्या अगदी म्हाताऱ्या जर्जर होऊन कायमच्या आटून पूर्णपणे निरुपयोगी होऊन गेल्या होत्या. केवळ त्वचा व हाडांचे सांगाडे असलेल्या भाकड गाईंना दान म्हणून घेऊन कोण सांभाळ करील? नचिकेत हा दान विधी पाहत होता. कास आटून गेलेल्या गाईंचे दान आपला पिता करीत असलेले पाहून नचिकेताला शंका आली की, हे दान विफल तर होणार नाही ना. अशा कुचकामी, कुलक्षणी गाई ठरवून दान म्हणून देणारा हा दुःखी लोकांचा धनी होतो.

## ।। मंत्र ४ ।।
## पिता-पुत्र संवाद

**स होवाच पितरं तत, कस्मै मां दास्यसीती ।**
**द्वितीयं तृतीयतँ होवाच, मृत्यवे त्वा ददामीति ।।४।।**

### अन्वयार्थ

**सः ह पितरम् उवाच** - तो पित्यास म्हणाला, तुम्ही मला कोणाला दान देणार आहात असे; **तम् द्वितीयम् तृतीयम् ह उवाच** - असे (एकदा नव्हे) दोनदा, तीनदा म्हणाला; **त्वां मृत्यूवे ददामि इति** - 'तुला यमाला दान देणार आहे' (असे रागावून त्याचे वडील म्हणाले.)

### भावार्थ

तेव्हा तो आपल्या पित्याला म्हणाला, ''बाबा, तुम्ही मला कोणाला देणार?'' त्याने असे दोन-तीन वेळा विचारले. तेव्हा पिता म्हणाला, ''मी तुला मृत्यूला देऊन टाकीन.''

विश्वजीत यज्ञामध्ये शास्त्रानुसार दान न झाल्याने आपल्या पित्याचा मोठाच घात होईल असे नचिकेताला वाटले. नचिकेत हा चिंतनशील जिज्ञासू, सुसंस्कारित, पितृभक्त, कर्तव्यनिष्ठ व प्रामाणिक होता. त्याने विचार केला की, मी ही तर बाबांची संपत्ती वा धनच आहे. मी स्वतःचेच दान करवून घेऊन बाबांना सर्व धनाच्या, सर्वस्वाच्या दानाचे पुण्यफल प्राप्त करून देईन. पुत्र म्हणून हे माझे कर्तव्यच आहे. मी माझे समर्पण करून पुत्र म्हणून या जगात धन्य होईन असा विचार करून नचिकेता वडिलांजवळ गेला आणि त्यांना म्हणाला, ''बाबा, दक्षिणा म्हणून तुम्ही मला कोणाला दान देणार आहात.'' वाजश्रवसानींनी त्याच्या बोलण्याकडे लक्षच दिले नाही. वडील लक्ष देत नाहीत म्हणून नचिकेताने पुनःपुन्हा तोच प्रश्न विचारला. या वेळी नचिकेताचा पिता खूप रागावला व रागाच्या भरात नचिकेताच्या अंगावर खेकसून म्हणाला, 'सूर्यपुत्र जो यमदेव त्याला मी आता तुला देऊन टाकतो.' यज्ञातील अग्निदेवतेसमोर उच्चारलेले शब्द अथवा दान दिले गेलेच पाहिजे असा बाल नचिकेताने मनाशी निश्चय केला.



## ।। मंत्र ५ ।।

**बहुनामेमि प्रथमो बहुनामेमि मध्यमः ।**
**किं स्विद्यमस्य कर्तव्यं यन्मयाऽद्य करिष्यति ।।५।।**

### अन्वयार्थ

**बहुनाम् प्रथमः एमि** - अनेकांपैकी मुख्यवृत्तीने मी यमराजाकडे जातो; अनेकांपैकी मध्यम म्हणून मी जातो; **किम् स्वित् अस्य (यमस्य) कर्तव्यम्** - यमांचे असे कोणते कार्य आहे की; **(यत्) मया अद्यकरिष्यति** - जे (बळी दिल्या) जाणाऱ्या माझ्याकडून ते आता सिद्धीला नेणार आहेत.

### भावार्थ

अनेक शिष्य किंवा पुत्रांमध्ये मी प्रथम वृत्तीने म्हणजे श्रेष्ठ मार्गाने वागत आलो आहे. (मी अधम मार्ग किंवा क्षुद्र वृत्ती कधीही स्वीकारली नाही.) अशा स्थितीत मला यमाच्या हवाली करून यमाचे कोणते कार्य माझे वडील साधणार आहेत?

कर्तव्यनिष्ठ शिष्य व पुत्र अशा दोन्हीही भूमिकांतून केलेले नचिकेताचे हे चिंतन आहे. त्याचा पिता हा त्याचा गुरूही होता. गुरुवचन कधीही निष्फळ ठरत नाही अशी त्याची श्रद्धा होती. सर्वांमध्ये उत्तम प्रकारे व क्वचित मध्यम प्रकारे शिष्य धर्म पाळीत असतात. मी कोणतीही प्रतारणा केली नाही मग अशी गुणसंपदा असूनसुद्धा पित्याने संतप्त होऊन मृत्यूच्या स्वाधीन करण्याचे ठरविल्याबद्दल मनुष्य जेव्हा पाप करतो तेव्हा यमदेव दंड करतो, मग यमदेवाकडे पाठविण्यासारखे कोणते कर्म पित्याला दिसले? आता पित्याची आज्ञा मोडू नये अशी शास्त्राज्ञा असल्याने मला या इच्छेचे पालन करावेच लागेल. ईश्वराच्या योजना अकारण नसतात. आपले दान यमाला घडावे या गोष्टीची योजना झाली तेव्हा तिचे कार्यही नियोजित झालेले असणार. आता प्राप्त कर्तव्य करणे हेच आपले काम आहे. रागाने बोलणाऱ्या पित्याच्या मनात आता पश्चात्ताप व दुःख यांनी जागा घेतली. मी पुत्राला निष्कारण शिक्षा केली असा तो शोक करू लागला. तेव्हा नचिकेता पित्याला म्हणाला,

## ।। मंत्र ६ ।।

**अनुपश्य यथा पूर्वे प्रतिपश्य तथा परे ।**
**सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाऽऽजायते पुनः ।।६।।**

### अन्वयार्थ

**पूर्व यथा (अतिक्रान्ताः) (तान्) अनुपश्च** - आपल्या पूर्वजांनी कसे वर्तन केले ते आठवा; **तथा (वर्तन्ते तान्) अपरे प्रतिश्य** - त्याप्रमाणे वर्तमानकालीन कसे आचरण करतात ते सुद्धा पाहा; **मर्त्यः** - मानव शेतातील धान्याप्रमाणे नाश पावतो; **सस्यम् इव पुनः आजायते** - आणि धान्याप्रमाणेच पुन्हा जन्म घेतो.

### भावार्थ

तो (अविचाराने भलतेच बोलल्याबद्दल पश्चात्ताप करणाऱ्या) वडिलांना म्हणाला, ''बाबा, आपल्या पूर्वीच्या व वर्तमानकाळातील लोकांचे आयुष्य पाहा. माणसे पिकलेल्या धान्याप्रमाणे गळून पडतात (मरतात), आणि नवीन उगवणाऱ्या धान्याप्रमाणे जन्म घेतात (म्हणून जन्म पुनःपुन्हा प्राप्त होत असल्याने माझ्याविषयी शोक न करता मला यमगृही पाठवा, व आपले वचन खरे करा).''

हा श्लोक म्हणजे पुत्राने आपल्या पित्याला उद्देशून बोललेले मनोगत आहे व वैदिक तत्त्वज्ञानाचा एक महत्त्वाचा सिद्धांत या श्लोकात व्यक्त झाला आहे. पुनर्जन्माच्या सिद्धांताचा स्पष्ट निर्वाळा व्यक्त झाला आहे.

आपला जन्म हा आपल्या गत जन्मातील कर्माचे फलित आहे. आपले वर्तमानकालीन जीवन हे भूतकाळातील कर्माशी संबंधित व भविष्यकाळातील पूर्वनियोजित अशा कर्माशी जोडणारा दुवा आहे. भूतकाळात जीवाचे अनेक जन्म होऊन गेले व भविष्यकाळात पुनःपुन्हा असे जन्म होणार आहेत. या सर्व जन्मांची स्मृती आपल्याला नसते म्हणून हे आठवतातच असे नाही. पण परमात्म्याच्या कवेत या साऱ्या गोष्टी येतात व या सर्वांची नोंद त्या परमशक्तीच्या ठिकाणी असते. भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला चौथ्या अध्यायात याची जाणीव करून देतात. अर्जुनाला जरी पूर्वीचे जन्म माहीत नसले तरी भगवंताला मात्र या सर्व जन्मांची माहिती आहे. पुनःपुन्हा जन्म, पुनःपुन्हा मृत्यू असे हे जन्म-मरणाचे रहाटगाडगे अव्याहत चालू आहे.

या श्लोकात धान्याचा दृष्टांत अतिशय बोलका आहे. बीजरूपाने पेरल्यानंतर



त्याला अंकुर येतात, अंकुर वाढतो, हिरवागार तृणाने भरलेला असा परिपक्व होतो. नंतर पिवळा पडून गळून जातो. त्यातील बीजरूपाने शिल्लक राहिलेल्याचा पुन्हा अंकुर व्हायला लागतो. असे हे सृष्टीचक्र जसे आहे तसेच मनुष्यजन्माची अवस्था आहे.

अस्ति, जायते, वर्धते, विपरी णमते, अप क्षीयते व शेवटी क्षीयते, अशा सहा अवस्थांमध्ये मनुष्यजन्माचा विकास होतो. ज्याला जन्म आहे त्याला मृत्यू आहे. जे जे उपजते ते ते नाश पावते. गर्भावस्थेतील अवस्था, बाल्य, कौमार्य, यौवन, प्रौढपण, वृद्धत्व व शेवटी मृत्यू अशी ही मनुष्यजन्माची कथा. पण ही कथा मृत्यूने संपत नाही. मृत्यूनंतरसुद्धा जीवन असल्यामुळे मृत्यू हे केवळ स्थित्यंतर असते. अशा या मृत्युलोकांत सर्वच गोष्टी अनित्य असल्यामुळे आपण सत्याने व नीतीने का वागू नये? आपले अनेक पूर्वज सत्याचे आचरण करणारे होते व आजही तसे अनेक सत्यव्रती आहेत. अशा लोकांचे अनुकरण करून बोलल्याप्रमाणे आपण आपले वर्तन का करू नये?

म्हणून नचिकेत आपल्या यमलोकात जाण्याच्या प्रतिज्ञेशी ठाम आहे. यमलोकात जाण्यासाठी पित्याने आपल्याला आता परवानगी द्यावी असे त्याने सुचविले. स्वधर्माचे, स्वकर्तव्याचे असे पालन केल्यानेच मनुष्याची अंतरशुद्धी होते. नचिकेत हा असा आदर्श पुत्र होता.

## ।। मंत्र ७ ।।
## यमलोकात नचिकेत

**वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान्**
**तस्यैतां शान्तिं कुर्वन्ति हर वैवस्वतोदकम् ।।७।।**

### अन्वयार्थ

**वैश्वानरः ब्राह्मणः अतिथिः इव गृहान् प्रविशति** - ब्राह्मण अतिथी जणू अग्नी म्हणूनच घरात प्रवेश करतो; **(अर्घ्य - पाद्यदान लक्षणानाम्) शान्तिम् कुर्वन्ति** - गृहस्थी त्याची शांती करतात; **वैवस्वत! उदकं हर** - हे वैवस्वता, पाणी आण.

**भावार्थ**

ब्राह्मण अतिथी होऊन अग्नीसारखा घरात प्रवेश करत असतो; साधुपुरुष त्या अतिथीची अर्घ्य - पाद्यादानाने शांती करतो. हे वैवस्वता! ती शांती करण्याकरिता (पाद्य - अर्घ्य आसनादी) पाणी घेऊन ये.

## ।। मंत्र ८ ।।

**आशाप्रतीक्षे संगतां सूनृतां च**
**इष्टापूर्ते पुत्रपशूंश्च सर्वान् ।**
**एतद् वृङ्क्ते पुरूषस्याल्पमेधसो**
**यस्यानश्नन्वसति ब्राह्मणो गृहे ।।८।।**

**अन्वयार्थ**

**यस्य गृहे बराह्मणः अनश्नन् वसति** - ज्याच्या घरात ब्राह्मण अतिथी काही न खाता राहतो अशा; **अल्पनेधसः पुरूषस्यः** - अल्पबुद्धी गृहस्थीच्या; **आशाप्रतीक्षे** - (ज्ञात आणि अज्ञात वस्तूसंबंधीच्या) आशा-आकांक्षा; **संगताम्** - त्यांच्या संयोगाने प्राप्त होणारे फल; **सूनृतां च** - तसेच प्रिय वाणीने मिळणारे फल; **इष्टापूर्ते** - यज्ञयागादी कर्माचे फल; **पुत्रपशूंश्च** - पुत्र आणि पशुधन; **सर्वान् एतत् वृङ्क्ते** - या सर्वांचा नाश होतो.

**भावार्थ**

'ज्या मंदबुद्धी गृहस्थाच्या घरी ब्राह्मण अतिथी उपोषित राहतो, त्याच्या ज्ञात आणि अज्ञात इच्छापूर्तीचे फल, मधुरवाणी, यज्ञ आणि परोपकार कृत्यांचे फळ, पुत्र, पशू हे सर्व नाश पावतात.'

आपल्या पित्याचे मन वळवून आणि त्यांची सांत्वना करून नचिकेत यमाच्या राज्यात येऊन पोहोचला. तेथे यमधर्म बाहेर गेलेले असल्यामुळे त्या बालकाला तीन दिवस व तीन रात्री तिष्ठत काढाव्या लागल्या. नचिकेताचा आत्मनिग्रह व आत्मसंयम याचे दर्शन इथे घडते. तिसऱ्या दिवसाच्या शेवटी मृत्युदेव जेव्हा घरी परतले तेव्हा त्यांची सहधर्मचारिणी व त्यांचे मंत्री काय म्हणाले हे सातव्या मंत्रात दिले आहे. 'अतिथी देवोभव' म्हणणारी आपली संस्कृती आहे. महाभारतातसुद्धा कर्ण व ब्राह्मण अतिथी यांचा एक प्रसंग आहे. कर्म म्हणजे मूर्तिमंत औदार्य. अशा कर्णाकडे एक ब्राह्मण अतिथी आला



त्या वेळी एक सोन्याचे पात्र कर्णाच्या डाव्या हातात होते. अतिथीला पाहून कर्णाने एका क्षणात ते सोन्याचे पात्र त्या ब्राह्मणाला देऊन टाकले. डाव्या हाताने दान देऊ नये असा संकेत आहे म्हणून त्याच्या मित्राने कर्णाला विचारले, ''त्या ब्राह्मणाला हे दान डाव्या हाताने तू का केलेस?'' तेव्हा कर्ण उत्तरला, ''हे बघ, डाव्या हातातून उजव्या हातात हे पात्र घेत असताना तेवढ्या वेळेत माझी मती जर बदलली असती तर?'' अतिथीला दान देणे हा आपल्या उदात्त संस्कृतीचा धर्म आहे.

अतिथीची या ठिकाणी अग्नीशी तुलना केलेली आहे. कारण मृत्यूनंतर परलोकात पुण्य संपादन करण्याची अग्निपूजा ही वैदिक काळात रूढ झालेली पद्धती होती. अग्नी हा ब्राह्मण अतिथीरूपाने घरात प्रवेश करीत असतो. वैश्वानर म्हणजे सर्व मानवाचा असाही अर्थ होतो. अशा अतिथीची पाद्यपूजा, दान, अर्घ्य अशा साधनानी शांती करावयाची असते. येथे ब्राह्मण हा शब्द जातीवाचक अथवा जन्माने प्राप्त झालेली अवस्था असा नसून जी साधनशूचितेने व बौद्धिक सामर्थ्यानी संपन्न असते अशी व्यक्ती मग ती कोणत्याही जातीतील असो.

आठव्या मंत्रात अशी सदाचरणी व्यक्ती जी अतिथी म्हणून आली आहे त्या व्यक्तीकडे जर दुर्लक्ष झाले व तो अतिथी जर उपाशी राहिला तर त्या घरातील मूर्ख पुरुषाच्या आशा-अपेक्षा, इच्छा-आकांक्षा व इतर कर्मांची फळे या सर्वांना त्याला मुकावे लागते. व त्याच्या पदरी निराशा व अपेक्षाभंग याशिवाय काहीही पडत नाही. प्रत्येक गृहस्थाला दररोज जे पंचमहायज्ञ करावे लागतात त्यापैकी अतिथीला नारायण समजून भोजन घालणे हा एक यज्ञ आहे, असे आपल्या संस्कृतीत म्हटले जाते. गृहस्थाची सांपत्तिक स्थिती कशीही असो व वेळ कोणतीही असो, पण अतिथीचे स्वागत व पूजन केले पाहिजे.

## ।। मंत्र ९ ।।
## यमराजाचे वरप्रदान

**तिस्त्रो रात्रीर्यदवात्सीर्गृहे मे**
**अनश्नन्ब्रह्मन्नतिथिर्नमस्यः**
**नमस्ते स्तु ब्रह्मन्स्वस्ति मेऽस्तु**
**तस्मात्प्रति त्रीन्वरान्वृणीष्व ।।९।।**

**अन्वयार्थ**

यम म्हणाला, **ब्रह्मन्** - हे ब्राह्मणपुत्रा; **नमस्यः अतिथिः (सन्)** - तुला नमस्कार. योग्य अतिथी असूनही माझ्या घरी तीन रात्री ज्या अर्थी भोजन न करता राहिलात; **तस्मात् त्रीन् वरान् वृणीष्व** - त्या अर्थी (त्या मोबदल्यात) तीन वरांची निवड करा; **नमः ते अस्तु** - तुम्हाला साष्टांग नमस्कार असो; **स्वस्ति मे अस्तु** - माझे कल्याण होवो.

**भावार्थ**

हे ब्राह्मणा! तुला नमस्कार असो. माझे कल्याण असो. आपण वंद्य अतिथी असूनही माझ्या घरी तीन रात्री उपाशी राहिलात म्हणून एका रात्रीसाठी एक असे तीन वर मागून घ्यावेत.

एक बालक जो अतिथीच्या रूपात आला आहे त्याला यमदेवानी अत्यंत नम्रपूर्वक अभिवादन करून क्षमायाचना केली. यमदेवानी आपल्या संस्कृतीचे व धर्माचे पालन केले. एका सामान्य व्यक्तीसमोर एक सामर्थ्यवान दैवीशक्ती धर्मपालनासाठी नतमस्तक होते हा भाव येथे व्यक्त झाला आहे. आपल्या पित्याला दिलेला शब्द पाळण्यासाठी नचिकेत यमप्रासादात जातो आणि त्या ठिकाणी तीन रात्री काहीही न खातापिता राहतो याबद्दल यमदेवाना अतीव दुःख झाले व यजमानाच्या हातून घडलेल्या अनादराचे प्रायश्चित म्हणून यमदेवानी नचिकेताला कोणतेही तीन वर मागण्यासाठी विनविले.

## ।। मंत्र १० ।।

## पितृपरितोष

**शान्तसंकल्पः सुमना यथास्याद्**
**वीतमन्युर्गौतमो माऽभि मृत्यो**
**त्वत्प्रसृष्टं माऽभिवदेत्प्रतीत**
**एतत्त्रायाणां प्रथम वरं वृणे ।।१०।।**

**अन्वयार्थ**

(नचिकेत म्हणाला,) **मृत्यो** - हे मृत्युदेवते; **मा अभि वीतमन्यु** - माझ्याविरुद्ध त्यांचा क्रोध न राहो; **त्वत् प्रसृष्टं मा अभिवदेत्** - तू मला पाठवून दिल्यानंतर तो माझे स्वागत करो. **एतत त्रयाणां प्रथम वरं वृणे** - हा मी तीन वरांपैकी पहिला वर मागतो.



**भावार्थ**

नचिकेत म्हणाला, 'हे यमदेवा! तीन वरांपैकी जो मी पहिला वर मागतो तो हा की, माझे पिताजी गौतम, त्यांच्याकडे जेव्हा तुम्ही मला परत पाठवाल तेव्हा ते संतुष्ट होवोत, आणि प्रसन्नचित्त आणि क्रोधरहित होवोत; आणि ते मला ओळखोत आणि माझे स्वागत करोत.'

## ।। मंत्र ११ ।।

**यथा पुरस्ताद् भविता प्रतीत**
**औद्दालकिरारूणिर्मत्प्रसृष्टः ।**
**सुखं रात्रीः शयिता वीतमन्युः**
**त्वांददृशिवान्मृत्युमुखात्प्रमुक्तम ।।११।।**

**अन्वयार्थ**

**रात्रीः सुखं शयिता** - तो रात्री सुखाने निद्रा घेईल; **मृत्यूमुखात प्रमुक्तम् त्वाम् ददृशिवान्** - मृत्यूच्या मुखातून मुक्त झालेल्या तुला पाहून; **वीतमन्युः (भविता स्यात्)** - तो क्रोधमुक्त होईल.

**भावार्थ**

माझ्या प्रसादाने अरुणपुत्र उद्दालक तुला पूर्ववत ओळखील व पुढील सर्व रात्री सुखाने झोपेल. कारण मृत्यूच्या मुखातून तुला सुटलेला तो पाहील.

नचिकेताने आपल्या पित्याच्या समाधानासाठी पहिला वर मागितला. पितृभक्त व कर्तव्यनिष्ठ नचिकेताने मृत्युदेवतेला सांगितले, ''मला यमसदनाला पाठविल्यामुळे हा नचिकेता आता काय करील अशी काळजी माझ्या पित्याला लागली असेल, त्यामुळे ते चिंताग्रस्त होऊन खिन्न झाले असतील. म्हणून पहिला वर मी असा मागतो की, माझा पिता चिंतामुक्त होवो, त्यांचे मन प्रसन्न होवो व माझ्यावरचा त्यांचा राग नाहीसा होऊन ते शांत चित्त होवोत. मी येथून स्वगृही परत जाईन त्या वेळी त्यांनी मला ओळखावे, कारण यमलोकातून सदेह परत जाणे हे केवळ असंभवनीय. म्हणून मी जेव्हा पहिल्या देहाने जाईन त्या वेळी त्यांना कोणतीही आशंका न येवो.'' केवळ पित्याच्या कल्याणाच्या इच्छेनेच पुत्रधर्म पाळून स्वधर्माचे त्याने पालन केले. नचिकेताच्या या पहिल्या वराला यमधर्मानी तथास्तु म्हणून आशीर्वाद दिला. ११ व्या मंत्रात मृत्युदेव

त्याला आशीर्वाद देऊन त्याने मागितलेल्या वराची पूर्तता करीत आहेत. माझ्या प्रसादाने अरुणपुत्र उद्दालक तुला पूर्वीप्रमाणेच ओळखील व तू मृत्युमुखातून परत आल्यामुळे तुझ्यावर तो प्रेमाचा वर्षाव करील. तेथून पुढे चिंतारहित होऊन तो सदासर्वकाळ सुखासमाधानाने राहील.

## ।। मंत्र १२ ।।
## स्वर्गस्वरूपदर्शन

**स्वर्गे लोके न भयं किंचनास्ति**
**न तत्र त्व न जरया बिभेति ।**
**उभे तीर्त्वांशनायापिपासे**
**शोकातिगो मोदते स्वर्गलोके ।।१२।।**

### अन्वयार्थ

भय नसते; **न तत्र त्वम्** - हे मृत्यो! तेथे तू नसतोसच; **जरया न बिभेति** - (तेथे) वार्धक्यास कोणी भीत नाही. तो शोकातीत होऊन स्वर्गलोकात आनंदी होतो.

### भावार्थ

हे मृत्युदेवा! स्वर्गलोकात कोणतेच भय नाही. तेथे आपल्याला वा वृद्धावस्थेला कोणीही भीत नाही. स्वर्गलोकात पुरुष तहान-भुकेच्या पलीकडे जाऊन शोकातीत होऊन आनंदाने राहतो.

## ।। मंत्र १३ ।।
## स्वर्गप्राप्ती व अग्निविद्या

**स त्वमग्निं स्वर्ग्यमध्येषि मृत्यो**
**प्रब्रूही त्वं श्रद्धधानाय मह्यम् ।**
**स्वर्गलोका अमृतत्वं भजन्ते**
**एतद् द्वितीयेन वृणे वरेण ।।१३।।**



### अन्वयार्थ

**मृत्यो** - हे मृत्यो! **स्वर्ग्यं अग्निम् सः त्वम् अध्येषि** - अशा रीतीने स्वर्गाला नेणाऱ्या अग्नीला तू जाणतोस; **(येन) स्वर्गलोकाः अमृतत्त्वम् भजन्ते** - (ज्याच्यामुळे) स्वर्ग प्राप्त करून घेणाऱ्या त्या लोकांना अमरत्व प्राप्त होते; **द्वितीयेन वरेण एतत् वृणे** - हे दुसऱ्या वराने मी मागतो.

### भावार्थ

हे मृत्युदेवा! स्वर्गास नेणाऱ्या अग्नीची तुला माहिती आहे, ज्यामुळे त्यांना स्वर्गलोक प्राप्त होतो, त्या अग्नीचे त्याबद्दल उत्सुक असणाऱ्या मला ज्ञान दे; हा माझा दुसरा वर मी मागतो.

नचिकेता यमदेवास म्हणाला, 'हे प्रभो! मनुष्य जन्मल्यापासून अखेरच्या श्वासापर्यंत केवळ सुखाची अपेक्षा करीत असतो, पण या मृत्युलोकीची कहाणी सगळी वेगळीच आहे. या मृत्युलोकात दुःखाचे डोंगरच आहेत आणि सुख मात्र जवाएवढे आहे. ज्याला ज्याला सुख म्हणून माणसे कवटाळतात ते सुखाचे बुरखा घेतलेले दुःखच असते. कितीही भोग भोगले तरी मनुष्याला अखंड सुखाची प्राप्ती होत नाही. या मृत्युलोकातल्या सर्वच गोष्टी अनित्य असल्यामुळे सतत भीतीच्या दडपणाखाली जीवन कंठावे लागते. पण स्वर्गात कोणतीच भीती नसून तेथे आपलाही प्रभाव चालत नाही. तेथे नाना व्याधी, वृद्धत्वाची भीती, मृत्यूची काळजी व भीती असे काहीच नाही. या ईहलोकात मनुष्याला तृष्णा, हव्यास यांनी ग्रासले आहे. पण स्वर्गात मात्र शरीर वा मनाला कसलेच दुःख नाही. तेथे गेल्यास निर्वेधपणे अखंड सुख भोगता येईल.'

हे मृत्युदेवा! आपण स्वर्गप्राप्तीकर अग्नीला जाणता, त्या स्वर्गलोकी जाण्याला साधनभूत होणारी अशी जी अग्निविद्या आहे ती आपण मला सांगावी. तो अग्नी ज्या यज्ञकर्माने प्रदीप्त होतो तो मार्ग आपण मला सांगावा. हा माझा दुसरा वर मी मागत आहे. म्हणून तेराव्या मंत्रात या अमृततत्त्वाची ज्यामुळे प्राप्ती होईल अशा धार्मिक यज्ञविधीच्या रहस्याची दीक्षा आपणास द्यावी, अशी विनंती नचिकेत मृत्युदेवाकडे करीत आहे.

|| मंत्र १४ ||

**प्र ते ब्रवीमि तदु मे निबोध**
**स्वर्ग्यमग्निं नचिकेतः प्रजानन् ।**
**अनन्तलोकाप्तिमथो प्रतिष्ठाम्**
**विद्धि त्वमेतं निहितं गुहायाम् ।।१४।।**

**अन्वयार्थ**

मी तुला स्वर्गप्राप्तीकरिता हितकारक अशा अग्नीसंबंधी सांगतो. **नचिकेतः** – हे नचिकेता! **तत् उ मे निबोध** – ते तू माझ्याकडून चांगले समजावून घे; **अनंत लोकाप्तीम्** – शाश्वत स्वर्गाची प्राप्ती करून देणाऱ्या; **अथो प्रतिष्ठाम्** – विश्वाचे अधिष्ठान असलेल्या; **गुहायाम् निहितम् एतम् त्वम् विद्धि** – हृदय (बुद्धी) गुहेत विराजमान झालेला आहे त्या तू जाणून घे.

**भावार्थ**

हे नचिकेता! त्या स्वर्गप्राप्तीकर अग्नीला मी चांगला जाणीत असून जो तुला (त्याचा) उपदेश देईन तो चांगल्या रीतीने जाणून घे. तो अग्नी अनंत लोकांची प्राप्ती करून देणारा असून तो बुद्धीरूपी गुहेत आहे असे जाण.

|| मंत्र १५ ||

**लोकादिमग्निं तमुवाच तस्मै**
**या इष्टका यावतीर्वा यथा वा ।**
**स चापि तत्प्रत्यवदद्यथोक्तम्**
**अथाऽस्य मृत्यूः पुनरेवाह तुष्टः ।।१५।।**

**अन्वयार्थ**

**तम् लोकादिं अग्निम्** – (तेव्हा यमराजाने) परलोकप्राप्ती – कारणभूत तो अग्नी; **या इष्टकाः** – यज्ञवेदीकरिता कोणत्या प्रकारच्या विटा त्याला लागतात; **यावतीः वा** – त्या संख्येने किती लागतात; **यथा वा** – त्या कशा प्रकारे रचल्या जातात; **तस्मै उवाच** – या सर्वांचे वर्णन त्याला केले; **सः** – (नचिकेतानेही) जसे त्याला सांगितले होते तसेच पुन्हा ऐकविले; **अथ अस्य तुष्टः मृत्यूः पुनः**



**एव आह** – करिता त्यावर प्रसन्न होऊन मृत्युदेव पुन्हा बोलले.

**भावार्थ**

यमराजाने नंतर त्याला परलोकप्राप्तीला साहाय्यभूत होणारा यज्ञाग्नी, त्याच्या वेदीकरिता कोणत्या विटा लागतात, त्या किती लागतात, आणि त्या कशा रचल्या जातात, हे सर्व वर्णन केले. नचिकेतानेही परत (आपल्या गुरूंना) ते सर्व पुन्हा म्हणून दाखविले. यमदेव त्याच्यावर संतुष्ट होऊन पुन्हा म्हणाले,

|| मंत्र १६ ||

**तमब्रवीत्प्रीयमाणो महात्मा**
**वरं तवेहाद्य ददामि भूयः ।**
**तवैव नाम्ना भवितायमग्निः**
**सृंकां चेमामनेकरूपां गृहाण ।।१६।।**

**अन्वयार्थ**

**प्रीयमाणः महात्मा तम् अब्रवीत्** – प्रसन्न झालेले महात्मे (यमराज) त्याला म्हणाले; **अद्य तव इह भूयः वरम् ददामि** – आता तुला मी आणखी एक वर देतो; **अयं अग्निः तव एव नाम्ना भविता** – हा अग्नी तुझ्याच नावाने प्रसिद्ध होईल; तू ही विविध रंगांची (शब्दावती) रत्नमाला स्वीकार.

**भावार्थ**

महात्मे यमदेव प्रसन्न होऊन त्याला म्हणाले, ''मी तुला आणखी एक वर देतो. हा अग्नी तुझ्याच नावाने ओळखला जाईल. तू ही विविध रंगांची (शब्दावती) रत्नमाला धारण कर.''

१४व्या मंत्रात मृत्युदेव नचिकेताला त्याच्या इच्छेप्रमाणे उपकृत करीत आहेत व आपण जे हितकारक सांगत आहोत ते नीट लक्षपूर्वक जाणून घेण्याविषयी सूचना करीत आहेत. स्वर्गप्राप्तीची इच्छा असणाऱ्याने हा विधी नीट समजून घ्यावा. नचिकेतानेही यमदेवाने शिकविलेले सर्व काही बुद्धीने जाणून घेतले.

या विराट ब्रह्मांडात अग्नी हा विश्वाचा आधार आहे. नाना लोकांच्या

उत्पत्तीचे हे अग्नितत्त्व कारण आहे. हा अग्नी हृदयाच्या गुहेत म्हणजेच ज्ञानवानाच्या बुद्धीत स्थित असा आहे. 'निहितम् गुहायाम्' म्हणजे गुहेत लपलेला. या ठिकाणी उपनिषदकारांना असे सुचवायचे आहे की, यज्ञकुंडातील प्रज्वलित अग्नी हे अग्नीचे बहिःस्थ आहे. तोच अग्नी मनुष्याच्या हृदयात वैश्वानराच्या रूपात प्रगट आहे. वैदिक काळामध्ये जो यज्ञविधीवर भर होता तो पुढे पुढे तसा न राहता अंतःर्मुख होऊन आत्मशक्तीचे व आत्मज्ञानाचे मर्म शोधण्याच्या साधनेत यत्न होऊ लागला. म्हणून यज्ञकर्म हेच काही सर्वस्व नव्हे असा विचार पुढे पुढे व्हायला लागला.

यमराजाने या आपल्या शिष्याला सर्व तपशिलासह यज्ञविधी स्पष्ट करून सांगितला. या यज्ञकांडातला संपूर्ण तपशील हा स्थूल स्वरूपात सांगितला. या अग्निरूप यज्ञाचे सर्व मंत्र, उपधान व विटा समजावून सांगितल्या. नचिकेताने तो संपूर्ण पाठ पुन्हा म्हणून दाखविला. आपल्या शिष्याची ही अचाट स्मरणशक्ती व बुद्धिमत्ता पाहून मृत्युदेव अतिशय आनंदित झाले.

यमराजानी आपल्या शिष्याला एक नवरत्नांची पवित्र माळ बहाल केली. श्री शंकराचार्य आपल्या भाष्यात या शब्दाला दोन अर्थ सांगतात -

१) माला, २) अनेक उत्कृष्ट फले देणारी कर्मे - येथे एवढेच समजायचे की, यमदेव आपल्या शिष्यावर प्रसन्न होऊन त्याला त्याच्या कल्याणाची भेट देतात.

यमराजानी जो अग्नी समजावून सांगितला त्याला नचिकेताग्नी अशा नावाने ओळखले जाईल व त्याची त्रिखंडात कीर्ती होईल.

## || मंत्र १७ ||

**त्रिणाचिकेतस्त्रिभिरेत्य सन्धिम्**
**त्रिकर्मकृत्तरति जन्ममृत्यू ।**
**ब्रह्मजज्ञं देवमीड्यं विदित्वा**
**निचाय्येमां शान्तिमत्यन्तमेति ।। १७ ।।**

### अन्वयार्थ

**त्रिणाचिकेतः** - तीन वेळा अग्नीचे चयन करणारा; **त्रिभिःसन्धिम् एत्य** - माता, पिता आणि आचार्य या तिन्हीशी संबंध प्राप्त करून; **त्रिकर्मकृत्** - (यज्ञ, अध्ययन आणि दान) ही तीन कर्मे करणारा; **जन्म-मृत्यू तरति** - जन्म-मृत्यूला तरून जातो; **ब्रह्मजज्ञम्** - (हिरण्यगर्भापासून) उत्पन्न झालेल्या ज्ञानी, स्तुतीयोग्य तेजस्वी अग्नीला शास्त्रतः जाणून; **इमाम् निचाय्य** - त्याला आत्मभावाने जाणून; **अत्यन्तम् शान्तिम् एति** - तो आत्यंतिक शांतीप्रत जातो.

### भावार्थ

त्रिणाचिकेत अग्नीचे तीन वेळा चयन करणारा, (माता, पिता आणि आचार्य) या तिन्हींशी संबंध प्राप्त करून (माता, पिता आणि आचार्य यांच्यापासून शिक्षण घेऊन) यज्ञ, अध्ययन आणि दान ही तीन कर्मे करणारा जन्म-मृत्यूच्या पार जातो; तसेच ब्रह्मापासून उत्पन्न झालेला आणि स्तुतियोग्य तेजस्वी अग्नीला शास्त्रतः तसेच आत्मभावाने जाणून अत्यंत शांतीप्रत जातो.

## || मंत्र १८ ||

**त्रिणाचिकेतस्त्रयमेद्विदित्वा**
**य एवं विद्वांश्चिनुते नाचिकेतम् ।**
**स मृत्यूपाशान्पुरतः प्रणोद्य**
**शोकातिगो मोदते स्वर्गलोके ।।१८।।**

### अन्वयार्थ

**त्रिणाचिकेतः** - तीन अग्नीसंबंधी जाणून घेतल्यावर; **यः विद्वान् एवम् नाचिकेतम् एवम् चिनुते** - जो याप्रमाणे नचिकेत यज्ञ करतो; **सः मृत्यूपाशान् पुरतः प्रणोद्य** - तो मृत्युपाश फेकून देऊन; **शोकातिगः स्वर्गलोके मोदते** - दुःखाच्या पलीकडे जातो आणि स्वर्गलोकात उपभोग घेतो.

### भावार्थ

जो त्रिणाचिकेत विद्वान या तीन प्रकारे अग्नीला यज्ञविधी जाणून (कोणत्या विटा, किती व कशा रचून वेदी तयार करावयाची इत्यादी) नचिकेत यज्ञ करतो, तो देहपात होण्यापूर्वीच मृत्यूची बंधने तोडून शोकपार होऊन स्वर्गलोकात आनंद उपभोगतो.

तीनवेळा ज्याने नचिकेताग्नीचे अनुष्ठान केले असेल त्याला या बळावर जन्ममरणाचा फेरा चुकविता येईल. विधीपूर्ण यज्ञ पूर्ण झाल्यानंतर त्याला मृत्यू दिसणार नाही. तो शाश्वत सुखाचा धनी होऊन देवाप्रमाणेच तेजस्वी व दैवीशक्तीने संपन्न होईल. जातवेदस् म्हणजे सर्वज्ञ असे एक अग्नीचे नाव

आहे. तसा तो सर्वज्ञ होईल की अग्नी विद्या म्हणजे त्या विराट पुरुषाची उपासना आहे. अग्नी हा त्या विराट पुरुषाचे प्रतीक आहे. कर्म व ज्ञान यांनी यज्ञानुष्ठान केल्याने यजमान ब्रह्मलोकी जाऊन दीर्घकाळ सुख भोगतो. यमदेव या ठिकाणी यज्ञ कर्म व त्याचे फल यासंबंधी सांगत आहेत. अग्निचयन करण्याचे तंत्र व मंत्र जाणून घेऊन जो नचिकेताग्नीचे तीन वेळा चयन करतो तो या ईहलोकातील सुखदुःखाच्या पलीकडे जातो. जो हा यज्ञ करतो तो मृत्यूनंतर हिरण्यगर्भ नामक अथवा ब्रह्मनायक अशा परिपूर्ण अवस्थेत पोहोचतो. नचिकेताग्नी यज्ञ पूर्णत्वास गेल्यानंतर तो या नश्वर शरीरात राहूनही मृत्युबंधनाच्या पलीकडे जातो. ज्या वेळी त्याच्या देहाचे पतन होते त्या वेळी तो अग्नीबरोबर स्वर्गात जाऊन आनंदाने राहतो.

## || मंत्र १९ ||

**एष तेऽग्निर्नचिकेतः स्वर्ग्यो**
**यमवृणीथा द्वितीयेन वरेण ।**
**एतमग्निं तवैव प्रवक्ष्यन्ति जनासः**
**तृतीयं वरं नचिकेतो वृणीष्व ।।१९।।**

### अन्वयार्थ

**नचिकेतः** - हे नचिकेता! **यम् द्वितीयेन वरेण वृणीथाः** - जो तू दुसऱ्या वराने मागून घेतलास; **एषः ते अग्निः स्वर्ग्यम्** - तो हा अग्नी स्वर्गाला नेणारा आहे. त्या अग्नीला तुझ्या नावानेच लोक ओळखतील; **तृतीयम् वरम् वृणीष्व** - आता तिसरा वर माग.

### भावार्थ

हे नचिकेता! ज्या दुसऱ्या वराने तू स्वर्गप्राप्तीकर अग्नी मागून घेतलास तो मी तुला सांगितला आहे. त्या अग्नीला आता लोक तुझ्या नावानेच ओळखतील. आता हे नचिकेता! तिसरा वर मागून घे.

शिष्याच्या अलौकिक बुद्धिमत्तेची व त्याच्या तळमळीची प्रशंसा करीत यमदेवाने आतापर्यंत दोन वर दिले. दुसऱ्या वराने नचिकेताने स्वर्गप्राप्तीकर अग्नीचा विधी समजून घेतला. असा हा स्वर्गप्राप्तीकर अग्नी लोक नचिकेताच्या



नावाने ओळखतील असे पुन्हा एकदा यमदेवानी सांगून टाकले व आता तिसरा वर मागून घेण्यासाठी नचिकेताला सुचविले. मृत्युदेवाने आपल्या प्रिय शिष्याला तिसऱ्या वराची आठवण दिली.

## || मंत्र २० ||
## तृतीय वर
## मृत्यूनंतरच्या गतीविषयी

**येयं प्रेते विचिकित्सा मनुष्ये**
**ऽस्तीत्येके नायमस्तीतिचैके ।**
**एतद्विद्यामनुशिष्टस्त्वयाऽहम्**
**वराणामेष वरस्तृतीयः ।।२०।।**

### अन्वयार्थ

**या इयम् विचिकित्सा** - जो असा संदेश आहे की; **मनुष्य प्रेते (सति) अयम् अस्ति इति एके** - मनुष्य मेल्यावर कोणी म्हणतात का तो आहे; **न (अयम्) अस्ति इति एके** - तर काही म्हणतात तो नसतो. तुमच्याकडून शिकून मी हे जाणून घ्यावे; **वराणाम् एषः तृतीयः वरः** - हा माझा तिसरा वर आहे.

### भावार्थ

मृत जीवाच्या बाबतीत एक शंका आहे. काही म्हणतात (मरणोत्तर) तो 'असतो'? तर काही म्हणतात 'नसतो'. आपण दिलेल्या ज्ञानाने मला ते जाणावयाचे आहे. हाच तिसरा वर मला द्या.

नचिकेत तिसरा वर मागण्यासाठी उद्युक्त होतो. स्वर्गसुखापेक्षाही श्रेष्ठ असे काही त्याला मागावयाचे आहे. मनुष्याला जन्म आणि मृत्यूचे रहस्य समजून घेण्याची अनादिकालापासून उत्कंठा आहे. भगवंताने जन्म आणि मृत्यू यामधील जीवनाचा निर्णय मनुष्याच्या हाती सुपूर्द केला पण जन्म व मृत्यूचे रहस्य आपल्याकडेच ठेवले. नचिकेताला हे सर्व काही जाणून घ्यावयाचे आहे. मनुष्य मेल्यानंतर कोणत्या ठिकाणी जातो की, त्याचे भस्म होऊन

पुढच्या गतीसाठी काहीच शिल्लक राहत नाही हे त्याला जाणून घ्यावयाचे आहे. त्याच्या मनात या विषयीचे जे जे संशय आहेत त्या सर्वांचे त्याला निराकरण करून घ्यावयाचे आहे. काहीजण म्हणतात मृत्यू म्हणजे शेवट असून त्यापलीकडे काहीही नाही. तर काहीजण असे म्हणतात, की मृत्यू म्हणजे पुढील जीवनाची सुरुवात आहे. मृत्यूनंतरचे जे जीवन आहे ते जाणून घेण्याची नचिकेताची इच्छा आहे. शरीर नाश पावणे म्हणजेच मृत्यू, की शरीर नाश पावल्यानंतरसुद्धा जीवनाचे अस्तित्व असते या विषयीचा संदेह त्याच्या मनात आहे. म्हणून नचिकेत आत्म्याच्या मरणोत्तर गतीचे ज्ञान तिसऱ्या वराने मागत आहे.

मृत्यूच्या वेळी जीवाला वासना धरून राहत असल्याने ज्याची जशी वासना असेल तशी त्याला मरणोत्तर गती मिळते. ज्याचे जसे कर्म व वासना असेल त्याप्रमाणे त्याला निरनिराळ्या लोकांची प्राप्ती होते. असे मत काही शास्त्रे सांगतात तर चार्वाकासारखे निरीश्वरवादी लोक म्हणतात की, देहाचे भस्म झाल्यानंतर तो कोठेही जाणे शक्य नाही. त्यामुळे पुनर्जन्म हा अस्तित्वातच नाही असे त्यांचे म्हणणे आहे. अशा मतमतांतराच्या गलबल्यात सामान्य माणूस तर भ्रमीत होतोच पण विद्वानांचीही मती कुंठित होते. त्यामुळे नचिकेताला यमदेवासारख्या श्रेष्ठ, ज्ञानीदेवतेकडून या शंकांचे निराकरण करून घ्यावयाचे आहे.

## ।। मंत्र २१ ।।
## नचिकेताची परीक्षा

**देवैरत्रापि विचिकित्सितं पुरा**
**न हि सुविज्ञेयमणुरेष धर्मः ।**
**अन्यं वरं नचिकेतो वृणीष्व**
**मा मोपरोत्सीरति मा सृजैनम् ।।२१।।**

### अन्वयार्थ

**नचिकेतः** - हे नचिकेता! **अन्यम् वरम् वृणीष्व** - (तू) दुसरा वर माग; **मा मा उपरोत्सीः** - याबाबत मला आग्रह करू नकोस; **एनम् मा आतिसृज** - हा वर (तू) माझ्यासाठी सोड.



### भावार्थ

हा विषय जाणून घेताना देवांनाही पूर्वीपासून संशय आहे. कारण हे सूक्ष्मज्ञान सहज जाणता येत नाही. (म्हणून) हे नचिकेता तू वेगळा वर मागून घे. मला अडचणीत टाकू नको. हा वर तू माझ्यासाठी सोडून दे.

यमधर्म नचिकेताला या तिसऱ्या वरापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत आहेत. ह्या गूढ विद्येचे रहस्य सांगण्यापूर्वी जणूकाही यमदेव नचिकेताची परीक्षाच घेत आहेत. हे गूढ ज्ञान अतिशय सूक्ष्म असल्यामुळे अल्पबुद्धीच्या अज्ञानी मनुष्याला आकलन होणे कठीण आहे. मनुष्यालाच नव्हे तर पुण्यशील आणि तेजस्वी असलेल्या देवांनाही हा कठीण विषय समजला नाही. येथे देव म्हणजे 'प्रकाशमान' - दैवीगुण संपन्न असणारे असे महान तेजस्वी दिव्य पुरुष ज्यांची बौद्धिक, मानसिक व आत्मिक शक्ती मनुष्याच्या तुलनेने अधिक असूनसुद्धा ते हे सूक्ष्मतत्त्व जाणू शकले नाहीत म्हणून तू सुद्धा हे असले काही न मागता प्रत्यक्ष ज्याचा भोग घेता येईल अशी काहीतरी श्रेष्ठ वस्तू तू मागून घे.

## ।। मंत्र २२ ।।
## नचिकेताचा निश्चय

**देवैरत्रापि विचिकित्सितं किल**
**त्वं च मृत्यो यन्न सुविज्ञेयमात्थ ।**
**वक्ता चास्य त्वादृगन्यो न लभ्यो**
**नान्यो वरस्तुल्य एतस्य कश्चित् ।।२२।।**

### अन्वयार्थ

(नचिकेत म्हणाला,) **देवैः** - या विषयाबाबत देवांनीसुद्धा खरोखर संशय घेतला होता; **यत् च न सुविज्ञेयम्** - आणि हे समजण्यास सोपे नाही; ते समजावून सांगणारा तुझ्याशिवाय कोणी सापडणार नाही.

### भावार्थ

नचिकेत म्हणाला - हे मृत्यो! ह्याशिवाय देवतांनाही संभ्रम होतो हे तर खरेच. शिवाय ते सहज कळणार नाही असे आपणही म्हणता. त्याचबरोबर ह्या ज्ञानाचा विवरण करणारा आपणासारखा दुसरा मिळणे शक्य नाही. मी

मागितला त्या वरासारखा दुसरा कोणताही वर नाही (तोच मला पाहिजे).

नचिकेताने यमदेवाचे सर्वकाही ऐकून घेतले पण आपल्या निश्चयापासून तो तसूभरही ढळला नाही. आपल्या शाश्वत सुखाविषयी निश्चित धारणा असल्यामुळे तो आपल्या मनोनिग्रहापासून विचलित झाला नाही. त्याने उलट सांगितले, 'हे प्रभो! देवतांनासुद्धा जे ज्ञान अगम्य आहे ते ज्ञान प्रदान करण्यासाठी तुझ्यासारखा ज्ञाता कोणीही नाही. त्यामुळे तूच माझ्या या वराची पूर्तता कर. असे गूढ ज्ञान समर्थ गुरूशिवाय लाभत नाही व तूच माझा महान गुरू आहेस, त्यामुळे हे श्रेष्ठ ज्ञान देऊन मला कृतार्थ कर.

## || मंत्र २३ ||

## यमदेवाचे पुन्हा प्रलोभन

**शतायुषः पुत्रपौत्रान्वृणीष्व**
**बहून्पशून्हस्तिहिरण्यमश्वान् ।**
**भूमेर्महदायतनं वृणीष्व**
**स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि ।।२३ ।।**

### अन्वयार्थ

**शतायुषः पुत्रपौत्रान् वृणीष्व** - (मृत्युदेव म्हणतात) तू शतायुषी शंभर पुत्र - पौत्रांचा वर माग; **(च) (वृणीष्व)** पशूंचे कळप, हत्ती, सोने - आणि घोडे (मात्र); **भूमेः महत् आयतनम् वृणीष्व** - पृथ्वीतलावरील महान साम्राज्य माग; जितकी वर्षे तुला जिवंत राहावेसे वाटेल तितकी वर्षे जीवन जग.

### भावार्थ

हे नचिकेता! शंभर वर्षे आयुष्य असलेले पुत्र, नातू, अमाप गोधन, हत्ती, घोडे व सोने मागून घे, अमोघ जमीन व राज्य मागून घे आणि तुला इच्छेप्रमाणे कितीही आयुष्य मागून घे.



## || मंत्र २४ ||

**एतत्तुल्यं यदि मन्यसे वरम्**
**वृणीष्व वित्तं चिरजीविकां च ।**
**महाभूमौ नचिकेतस्त्वमेधि**
**कामानां त्वा कामभाजं करोमि ।।२४।।**

### अन्वयार्थ

**वृणीष्व** - यांच्याइतकाच मोलाचा अन्य वर तुला वाटत असेल तर तो (तू) माग; **वित्तम चिरजीविकाम् च** - धन आणि आयुष्य माग; **महाभूमौ त्वम् एधि** - विशाल पृथ्वीचे तू राज्य कर; तुला दैवी तसेच मानुषी कामनांचा भोक्ता मी करतो.

### भावार्थ

ज्ञानाचा वर मागण्याच्या ऐवजी त्यासारखा दुसरा कोणताही वर मागून घे. चिरंजीवित्व किंवा अपार संपत्ती माग. ह्या प्रचंड भूलोकावर वैभवसंपन्न होऊन तू राहण्याची तुला इच्छा होईल ते तुला मिळेल.

## || मंत्र २५ ||

**ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके**
**सर्वान्कामांश्छन्दतः प्रार्थयस्व ।**
**इमा रामाः सरथाः सतूर्या**
**न हीदृशा लभ्भनीयाः मनुष्यैः ।।**
**आभिर्मत्प्रत्ताभिः परिचारयस्व**
**नचिकेतो मरणं मानुप्राक्षीः ।।२५।।**

### अन्वयार्थ

**मर्त्य लोके ये ये दुर्लभाः (सन्ति)** - या मृत्युलोकात जे जे भोग दुर्लभ असतात; **(तान्) सर्वान् प्रार्थयस्व** - त्या सर्व कामनांची तुझ्या इच्छेप्रमाणे मागणी कर; **इम्रः सतूर्याः रामाः ईदृशाः मनुष्यैः न हि सभ्भनीयाः** - त्यांच्या

रथासह आणि वाद्यासह अशा अप्सरा मानवास उपभोगाकरिता लाभत नाहीत; **मत्प्रत्ताभिः आभिः** - मी त्यांना तुझ्याकडे दिल्यानंतर तू त्यांच्याकडून सेवा घे; **नचिकेतः** - हे नचिकेता! **मरणं (मरणसंबंधम् प्रश्नम्) मा अनुप्राक्षीः** - मृत्यूनंतरच्या आत्म्याच्या स्थितीबद्दल तेवढे विचारू नकोस.

### भावार्थ

मनुष्यलोकी जे भोग अत्यंत दुर्लभ आहेत, ते तू इच्छेनुसार माग. येथे रथ, वाद्ये यासहित या सुंदर स्त्रियाही आहेत. अशा स्त्रिया (सामान्य) मनुष्यांना प्राप्त होत नसतात. मी देत असलेल्या या स्त्रियांकडून तू सेवा करून घे. पण नचिकेता! मरणासंबंधी मात्र प्रश्न विचारू नकोस.

शिष्याची परीक्षा घेण्यासाठी व त्याने आत्मज्ञानाचा वर मागू नये म्हणून यमदेवानी प्रलोभनांचे आमिष दाखविले. राज्य, सत्ता, शतायुषी जगू शकणारे पुत्र, अमाप गोधन, सोने असे ऐहिक लोकातील सर्वोच्च सुख देणाऱ्या इंद्रियगम्य सुखाच्या राशींचे मोह नचिकेतासमोर मांडले. यमदेवाना नचिकेताच्या वैराग्यशील वृत्तीची चाचपणी करायची होती. वैराग्याशिवाय ज्ञानप्राप्ती दुर्मिळ आहे असा शास्त्राचा संकेत आहे.

या आत्मज्ञानाच्या वराच्या ऐवजी दुसरा कोणताही वर मागून घेण्यास मृत्युदेवतेने सांगितले. भूलोकीतले कोणतेही वैभव व कितीही दीर्घकाल आयुष्य किंवा चिरंजीवित्व मागून घेण्यास सांगितले. या आत्मज्ञानाच्या ऐवजी देऊ केलेल्या वरांची यादीच यमदेवानी नचिकेतासमोर ठेवली.

पृथ्वीवर जे भोग पाहावयाससुद्धा मिळत नाहीत अशा दुर्लभ भोगांची प्राप्ती करून घेता येईल. मृत्युलोकात अप्सरासारख्या सुंदर स्त्रिया, रथ, वाद्ये यांच्यासह दुर्लभ आहेत. त्या सर्व तुला प्राप्त होतील. त्यांच्याकडून हवी ती सेवा तू करून घे; पण हे नचिकेता, मृत्यूनंतरच्या आत्म्याच्या स्थितीबद्दल तेवढे विचारू नकोस.

## ।। मंत्र २६ ।।
## नचिकेताची निरिच्छता

**श्वोभावा मर्त्यस्य यदन्तकैतत्**
**सर्वेन्द्रियाणां जरयन्ति तेजः ।**
**अपि सर्वं जीवितमल्पमेव**
**तवैव वाहास्तव नृत्यगीते ।।२६।।**



### अन्वयार्थ

**अन्तकः** - हे मृत्युदेवा; **मर्त्यस्य यत् श्वोभावाः** - मर्त्य मानवाचे (उद्या आहेत की उद्या नाहीत) असे ते अशाश्वत (भोग) आहेत; **एतत् सर्वे इंद्रियाणाम् तेजः जरयन्ति** - ते सर्व इंद्रियांचे तेज जीर्ण करतात; तू देऊ केलेले सर्व जीवन (दीर्घायुष्य असूनही) अल्पच म्हणावयाचे - तुझे ते अश्व, अप्सरांची नृत्यगीते तुझ्याजवळच राहोत.

### भावार्थ

हे यमराजा, हे मर्त्यमानवाचे सर्व भोग अशाश्वत असतात; ते सर्व इंद्रियांचे तेज मंद करतात. (तू देऊ केलेले) सर्व जीवन दीर्घायुषी असूनही खचितच अत्यल्पच ठरते. तुझे अश्व, ती अप्सरांची नृत्यगीतेसुद्धा तुझी तुलाच लखलाभ असो.

## ।। मंत्र २७ ।।

**न वित्तेन तर्पणीयो मनुष्यो**
**लपस्यामहे वित्तम द्राक्ष्म चेत्त्वा .**
**जीविष्यामो यावदीशिष्यसि त्वं**
**वरस्तु मे वरणीयः स एव ।।२७।।**

### अन्वयार्थ

**न वित्तेन तर्पणीयः मनुष्यः** - मनुष्य काही धनाने संतुष्ट होत नाही; जरी आम्ही तुला पाहिले तर आम्हाला धनही मिळेल; **(तावत्) (वयम्) जीविष्याम्** - जोपर्यंत तुझी सत्ता असेल तोपर्यंत आम्ही जगू; **सः एव वरः मे वरणीयः** - म्हणून तोच माझा वर म्हणून मागण्यास योग्य आहे.

### भावार्थ

मनुष्य धनाने संतुष्ट होत नाही. आता ज्या अर्थी माझ्यावर आपण प्रसन्न आहात त्याअर्थी धन आणि आपण (यमपदांचे) अधिकारावर आहात तोपर्यंत आयुष्य सहजच मिळेल, म्हणून मी जो वर मागितला तोच तिसरा वर मला पाहिजे.

## ।। मंत्र २८ ।।

**अजीर्यताममृतानामुपेत्य**
**जीर्यन्मर्त्यः क्वधस्थः प्रजानन् ।**
**अभिध्यायन्वर्णरतिप्रमोदान्**
**अतिदीर्घे जीविते को रमेत ।।२८।।**

### अन्वयार्थ

**क्व अधस्थ जीवन्मर्त्यः** - खालच्या जगात राहणारा कोण मर्त्य मानव. जराग्रस्त न होणाऱ्या आणि अमर्त्यांच्या जवळ जाऊनही; **वर्ण रति प्रमोदान् प्रजानन् अभिध्यायन्** - सौंदर्य आणि प्रेम (नाच-गाणे) यामुळे निर्माण होणाऱ्या सुखाच्या स्वरूपासंबंधी विचार केल्यावर; - अतिदीर्घ जीवनात सुख मानेल?

### भावार्थ

भूलोकी खाली राहणारा जरामरणयुक्त मनुष्य अजर व अमर अशा देवांच्या जवळ गेल्यावर व त्याला ओळखल्यावर कनककांतादिकापासून मिळणाऱ्या (नाशिवंत) सुखाचेच चिंतन करीत उदंड आयुष्यामध्येच कोण समाधान पावेल? ( म्हणजे शहाणा मनुष्य तुजसारख्या देवांचे दर्शन झाल्यावर अमृतत्व प्राप्तीचीच इच्छा धरील, विषयोपभोगासारख्या हीन सुखास भुलणार नाही.)

## ।। मंत्र २९ ।।

**यस्मिन्निदं विचिकित्सन्ति मृत्यो**
**यत्साम्पराये महति ब्रूहो नस्तत्**
**योऽयं वरो गूढमनुप्रविष्टो**
**नान्यं तस्मान्नचिकेता वृणीते ।।२९।।**

### अन्वयार्थ

**यस्मिन् इदम् विचिकित्सन्ति** - ज्या परमलोकात जीवाच्या संबंधात लोक (आहे की नाही असा) संदेह करतात (तसेच) जे ज्ञान परलोक विषयाबाबत मोठे आहे; **मृत्यो** - हे मृत्यो - ज्या आत्म्यासंबंधीचे जे हे ज्ञान गुप्त आहे; **नः तत् ब्रूही** - ते आम्हास सांग. **तस्यात् अन्यम् नचिकेतः न वृणीते** - त्याहून अन्य वर नचिकेत मागत नाही.



### भावार्थ

हे यमधर्मा, ज्या मोठ्या मार्गाविषयी (मोक्षमार्गाविषयी) जी ही शंका आहे तो मार्ग आम्हाला सांगा. जो हा गुप्त असा राहिलेला वर (मागितला) आहे, त्याहून निराळा वर हा नचिकेत मागणार नाही.

नचिकेताने यमदेवाला भोगांच्या स्वरूपाविषयी सांगितले. भोगांची साधने ही नाशवंत आहेत. भोग घेताना इंद्रिये सतत सक्षम राहतातच असे नाही. विषयांचा उपभोग घेत असताना बुद्धी, शक्ती, तेज या सर्वांचा क्षय होतो. मनुष्य निस्तेज होतो म्हणून भोग हे अनित्य, क्षणभंगुर व सुखाचा आभास निर्माण करणारे आहेत. पृथ्वीवरचे सर्व भोग जरी मिळाले तरी शाश्वत सुखाची प्राप्ती होईलच असे नाही. हे भोग भोगण्यासाठी कितीही मोठे दीर्घायुष्य मिळाले तरी एक दिवस भोक्त्याला मरण स्वीकारावेच लागणार. मग भोक्ताही गेला व भोगही संपले. धन, सत्ता व सर्व भोग जरी मिळाले तरी तृप्ती होत नाही. वासना कधी मिटत नाही.

मग असे अशांतीदायी आणि आत्मसुख न देणारे असे मला काही नकोच, असे नचिकेत म्हणाला. वैभवाने मनुष्याची सात्त्विकता निघून जाते. म्हणून ज्यामुळे मनुष्याचा विवेक नष्ट होतो असे ऐश्वर्य मला नको असे प्रांजलपणे तो म्हणाला. मनुष्याला वस्तू अखंड सुख देऊ शकत नाहीत. मृत्यूची भीती सतत असल्यामुळे मुक्तपणे त्याचे सुख भोगता येत नाही. मला जरी दीर्घायुष्य मिळाले तरी इतर माझ्या कुटुंबीयांच्या मृत्यूचे प्रसंग मला पाहावे लागतील, म्हणून ज्या वराने माझ्या आयुष्याची सार्थकता होईल असा जो वर आहे तोच मला द्या, असे सत्ताविसाव्या मंत्रात नचिकेत म्हणतो.

मनुष्याचे जीवन जरा, व्याधी, मृत्यू यांनी भरलेले आहे. मनुष्याचे सगळे भोग नश्वरतेच्या शापाने शापित झालेले आहेत. मिळालेल्या या सर्व वैभवांचा शेवट मृत्यूतच होणार असल्यामुळे प्राप्त होणारे अशांत जीवन कोण स्वीकारेल? हा नित्य-अनित्य, सार-असार, सत्य-असत्य विवेक ज्याला आहे तो अशा भोगामध्ये रममाण कसा होईल? म्हणून या मोहात मी न पडता व आत्मघात करून न घेता या आत्मज्ञानाची कास मी धरली तर ते वावगे होईल काय? आपल्या हृदयात ही अमृतरूपी ब्रह्मविद्या वास करीत असल्यामुळे आपण अमर झाला आहात, मग आपल्याला प्राप्त करून मी हे ज्ञान का करून न घ्यावे? म्हणून आपण मला मी जो वर मागितला तोच द्यावा, अशी माझी इच्छा आहे.

नचिकेत २९ व्या मंत्रात हे पुन्हा एकदा सांगत आहे. जीवाला मृत्यूनंतरची जी गती मिळते त्याचे रहस्य उकल करून सांगा. ही विद्या खूप गूढ आहे. विद्वानांना समजण्यास अवघड आहे व समजावून देणाऱ्याससुद्धा कठीण आहे, याची मला जाणीव आहे. तरीसुद्धा ज्याच्या लाभाने मनुष्य जीवनाचे शाश्वत कल्याण होते त्या आत्म्याचा मला बोध करून द्यावा. नचिकेताची ही मृत्युजिज्ञासा ही वस्तुतः आत्मजिज्ञासाच आहे. नचिकेत मुमूक्षु होता त्यामुळे मुक्तीची इच्छा त्याच्या मनात दृढ होती, तो आदर्श साधक होता. त्यामुळे आत्मलाभाशिवाय त्याला दुसरे काहीही नको होते. आत्मज्ञानानेच मनुष्य कृतकृत्य होतो यावर त्याची श्रद्धा असल्यामुळे त्याने या वराशिवाय दुसरे काहीही मागण्यास नकार दिला. सर्व भोग झिडकारून जीवनातील परम, अंतिम सत्य असा जो आत्मा आहे त्या विषयीचे सर्व संशय दूर करावेत, अशी त्याने याचना केली.

***पहिल्या अध्यायावरील पहिली वल्ली समाप्त***

×××



# प्रथम अध्याय - द्वितीय वल्ली

## ।। मंत्र १ ।।
## श्रेय - प्रेय विवेक

**अन्यच्छेयोऽन्यदुतैव प्रेयस्ते**
**उभे नानार्थे पुरूषं सिनीतः ।**
**तयोः श्रेय आददानस्य साधुः**
**भवति हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ।।१।।**

**अन्वयार्थ**

(यमराज म्हणाले), **अन्यत** - एक कल्याणप्रद आहे; **उत एव अन्यत् प्रेयः** - तर दुसरे खरोखर सुखद आहे; **(सति)** - ती दोन्ही भिन्न प्रयोदनरूप असल्यामुळे; **पुरूष सिनीतः** - पुरुषाला बंधनात टाकतात त्यापैकी श्रेयाची निवड करणाऱ्याचे कल्याण होते; **यः उ प्रेयः वृणीते** - जो प्रेयाची निवड करतो; **(सः) अर्थात् हीयते** - तो सत्यास पारखा होतो.

**भावार्थ**

श्रेय म्हणजे खरे हित वेगळे व प्रेय (म्हणजे उपभोगसुख) वेगळे आहे. भिन्न-भिन्न रूपांच्या या दोन गोष्टी पुरुषाला संबद्ध असतात. (या दोहोंचाही मनुष्याशी संबंध येतो) त्यापैकी श्रेय स्वीकारण्याने कल्याण होते व जो प्रेय स्वीकारतो तो पुरुषाला अंतरतो.

## ।। मंत्र २ ।।

**श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतः**
**तौ सम्परीत्य विविनक्ति धीरः ।**
**श्रेयो हि धीरोऽभि प्रेयसो वृणीते**
**प्रेयो मन्दो योगक्षेमाद् वृणीते ।।२।।**

## अन्वयार्थ

**मनुष्यम् एतः श्रेयः च प्रेयः च** - श्रेय आणि प्रेय या दोन्हीही मानवाला प्राप्त होतात; त्या दोहोंची पारख करून विद्वान त्यांना वेगळे करतो; **धीरः प्रेयसः अभि श्रेयः वृणीते** - (तथापि) धैर्यवान पुरुष प्रेयसापेक्षा श्रेयसाची निवड करतो; **मन्दः (तु) योगक्षेमात् प्रेयः वृणीते** - (परंतु) मंदबुद्धीचा पुरुष हाव आणि आसक्तीमुळे 'प्रेया'ची निवड करतो.

## भावार्थ

श्रेय व प्रेय (परस्परात मिसळून) माणसाजवळ येतात. या दोन्हींचा नीट विचार करून बुद्धिमान निवड करतो, विवेकी पुरुष प्रेय दूर सारून श्रेय स्वीकारतो, परंतु मंदबुद्धीचा मनुष्य चरितार्थाच्या अपेक्षेने प्रेयाचा स्वीकार करतो.

## ।। मंत्र ३ ।।

सत्वं प्रियान्प्रियरूपांश्च कामा-
नभिध्यायन्नचिकेतोऽत्यस्त्राक्षीः ।
नैतां सृङ्कां वित्तमयीमवाप्तो
यस्यां मज्जन्ति बहवो मनुष्याः ।।३।।

## अन्वयार्थ

(मी आतापर्यंत प्रलोभन दाखविलेल्या पुत्र-धनादी) प्रियरूप भोगांच्या असारत्वाचा विचार करणारा; **नतिकेतः** - हे नचिकेता; **तेषाम अत्यस्त्राक्षीः सः त्वम्** - त्यांचा त्याग करावा असा तू; **यस्याम् बहवो मनुष्याः मज्जन्ति** - ज्यामध्ये अनेकजण बुडून जातात; त्या धनमार्गाच्या शृंखलांचा तू अव्हेर केला आहेस.

## भावार्थ

हे नचिकेता! तू (पुत्र-धनादी) प्रिय आणि (अप्सरा आदी) भोग्य वस्तू यांचे असारत्व जाणून त्याग केला आहेस व बहुतेक लोक बुडून जातात अशी ही द्रव्यमय माला स्वीकारली नाहीस.

यमदेवानी आपल्या शिष्याची परीक्षा घेतली, निरनिराळी प्रलोभने दाखविली, पण नचिकेत तसूभरही ढळला नाही. आत्मलाभासाठी आपली योग्यता नचिकेताने सिद्ध केली. आता वास्तविक या पात्र शिष्याला आत्मविद्या सांगावयास सुरुवात करावयास हवी होती, पण तशी ती न करता नचिकेताची मनोभूमिका तयार करण्यासाठी श्रेय-प्रेय प्रवृत्तीचे मनोविज्ञान उपदेशिले. आत्मविद्येसाठी जी व्याकुळता व मुमुक्षत्व लागते ते साधकाच्या बुद्धीत विचारांनी पक्के असले पाहिजे म्हणून ही मनोभूमिका तयार करण्यासाठी श्रेय-प्रेय विवेकाचे ज्ञान सांगितले. बरेच साधक परमार्थ मार्गात यशस्वीपणे सुरुवात करतात. प्राथमिक अवस्थेत उदंड उत्साह असतो, पण पुढेपुढे या मार्गातील अडथळे पार करताना त्यांची दमछाक होते आणि पर्वतावरून एखादा दगड कोसळून क्षणात पायथ्याशी यावा तशी त्यांची अवस्था होते. निश्चयाचे बुरुज ढासळतात व ध्येय विचलित होऊन या मार्गापासून ढळतात. त्यामुळे कधीकधी यशस्वी साधकांच्या चरित्राबरोबर अयशस्वी साधकांची चरित्रेही अभ्यासावीत. आत्मनिरीक्षणासाठी हे आवश्यक असते. पण ज्याची मनोभूमिका बुद्धीने व विवेकाने युक्त आहे त्याचे पतन अपवादात्मकच असते, म्हणून यमराज या श्रेय आणि प्रेयाचा मार्ग समजून सांगताहेत.

श्रेय निराळे आणि प्रेय निराळे. भिन्न-भिन्न असलेल्या या प्रवृत्तींची फळेही वेगवेगळी आहेत. श्रेयाचे फल आहे मोक्ष अथवा मुक्ती व प्रेयाचे फल आहे संसारबंधन. श्रेयाने आत्मप्राप्तीचे फळ प्राप्त होते तर प्रेय हे देहाच्या भोगासाठीच असते. आत्मज्ञान होण्यासाठी शमदमादिकांचा अभ्यास हा जाणीवपूर्वक करावा लागतो. श्रेयाने आपला अभ्युदय होतो व प्रेय मनुष्याला भोगविषयाकडे वळविते. आत्मज्ञान हे श्रेयरूप असून प्रेय हे भोगलालसा व विषयांकडे वळविते. वास्तविक सुख हे प्रत्येक जीवाचे ध्येय असते. जीवनातील प्रत्येक कृती किंवा संघर्ष हा त्या सुखासाठीच असतो. मनुष्यच काय तर किडेमुंग्यासुद्धा सुखासाठी जीवाचे रान करीत असतात. श्रेय व प्रेय या दोन्ही मार्गांतून हे सुखच प्राप्त होत असते, पण दोन्ही मार्गांनी मिळणारी कर्माची फळे ही दोन प्रकारची असतात. श्रेय मार्गाने अखंड सुख व स्वर्गानंद प्राप्त होतो व अमरत्वाचा मार्ग प्राप्त होतो व प्रेय मार्गाने सुख मिळते पण ते क्षणभंगुर असते. सुखामागून दुःख व दुःखामागून सुख अशी प्रेय मार्गाची अवस्था असते. अखंड आंतरिक शांतीचा मार्ग केवळ श्रेय मार्गाने मिळवता येतो. प्रत्येक व्यक्तीला या दोन स्वतंत्र मार्गातील एक मार्ग निवडावा लागतो. तसे या दोन्हीही मार्गांनी मनुष्याला बद्ध केले जाते. श्रेय मार्गाने आत्मज्ञानाची वाट मिळते व प्रेय मार्गाने धनादी वैभव प्राप्त होते. दोहोंच्या ठिकाणी बंधरूप कौशल्य मात्र आहेच. याप्रमाणे श्रेय व प्रेय मार्ग हे एकमेकापासून सर्वस्वी भिन्न आहेत. त्यामुळे जो विवेकी आहे तो उच्चतम् ध्येयाला कवटाळतो व जो विषयाधीन आहे तो भौतिक सुखाच्या मागे लागून अविवेकाने प्रेयस मार्गाची निवड करतो.

याचे वर्णन दुसऱ्या मंत्रात स्पष्टपणे केले आहे. जीवन प्रलोभनांनी भरलेले आहे. ठायीठायी मोहाची व भोगाची ठिकाणे आहेत. एक खडतर मार्ग आहे व दुसरा सुलभ मार्ग आहे. एक ज्ञानाचा मार्ग आहे व एक अज्ञानाचा मार्ग आहे. एक विद्या व दुसरी अविद्या. अशा द्वंद्वात असताना विवेकी व शहाणा माणूस या दोहोतील साधकबाधक बाजूंचा निर्णायक विचार करून, जीवन कृतार्थ होण्याचा 'श्रेयस' मार्ग निवडतो व दुसऱ्या प्रकारचा मंदबुद्धीचा मनुष्य केवळ देहात्मकतेचा विचार करून तत्काळ सुख देणाऱ्या व इंद्रियांची भूक भागविणाऱ्या विषयोपभोगाचा मार्ग म्हणजेच 'प्रेयस' निवडतो. पशूतुल्य, विकारवश जीवन जगण्यासाठी पुरुषार्थाची गरज लागत नाही. पण अमृतमय जीवन भोगून कृतकृत्य होण्यासाठी मात्र विवेक आणि बुद्धीची नितांत गरज असते. प्रेयस मार्गातील मनुष्याला मी म्हणजेच देह अशी अज्ञानात्मक, अविद्यारूपी बुद्धी प्रवृत्त करत असते. पण जे स्वतःविषयी जागृत असतात ते प्रेयाला दूर ठेवून नीर-क्षीर न्यायाप्रमाणे राजहंसासारखे श्रेयसाचा मार्ग निवडतात.

यामुळे अत्यंत आनंदित होऊन यमदेवाने नचिकेताची प्रशंसा केली, कारण त्याने सर्व प्रकारचे मोह, भोगविषय, धनादीवैभव एवढेच नव्हे तर सुंदर अप्सरासारख्या स्त्रिया या सर्वस्वांचा त्याग करून आत्मकल्याणाचा श्रेयस मार्ग निवडला. म्हणून तिसऱ्या मंत्रात यमदेव नचिकेताच्या बुद्धीची व विवेकाची प्रशंसा करीत आहेत. मनुष्याचा काम कधीच संपत नाही. काम म्हणजे हे हवे, हे नको. मनुष्याच्या इच्छा, तृष्णा कधीच मिटत नाहीत. एका इच्छेच्या पूर्तीतून दुसरी इच्छा जन्मत असते. भोगांची साखळी कधी संपत नाही. अग्नीत तूप जसे ओतावे व अग्नी जसा भडकावा तसे मनुष्याच्या भोगांचे आहे. वृद्धत्व येते व इंद्रिये शिथिल होतात, पण वासना मात्र सजग असतात. या सुख-दुःखात्मक द्वंद्वामध्ये आयुष्य मात्र संपून जाते. म्हणून शहाणा माणूस विषयांच्या मागे न लागता अखंड शांतीचा मार्ग निवडतो.

## || मंत्र ४ ||

## विद्या व अविद्या

**दूरमेते विपरीते विषूची**
**अविद्या या च विद्येति ज्ञाता ।**
**विद्याभीप्सिनं नचिकेतसं मन्ये**
**न त्वा कामा बहवोऽलोलुपन्त ।।४।।**



### अन्वयार्थ

जी विद्या व अविद्या म्हणून ओळखली जाते; **एते दूरम् विपरीते विषूची** - ते दोन्हीही अत्यंत विरुद्ध धर्माचे आणि विपरीत फल देणारे आहेत; **(त्वाम्) विद्याभिप्सितं नचिकेतसं (अहम्) मन्ये** - त्या तुला, नचिकेता विद्याभिलाषी मी मानतो; (कारण) तुला अनेक भोगांचेही प्रलोभन झाले नाही.

### भावार्थ

विद्यारूप श्रेय आणि अविद्यारूप प्रेय एकमेकांना अत्यंत विरुद्ध असून विरुद्ध फळे देणारी आहेत. तुला मी विद्याभिलाषी समजतो, तू भोगाच्या आमिषांना भुलला नाहीस.

## || मंत्र ५ ||

**अविद्यायामन्तरे वर्तमानाः**
**स्वयं धीराः पण्डितं मन्यमानाः ।**
**दन्द्रम्यमाणाः परियन्तिमूढा**
**अन्धेनैव नीयामाना यथान्धाः ।।५।।**

### अन्वयार्थ

**अविद्यायाम अन्तरे वर्तमानाः** - ते अविद्येच्या (दाट) अंधकारात राहतात; (परंतु) स्वतःला शहाणे आणि विद्वान मानणाऱ्या; **दन्द्रम्यमाणाः मूढाः परियन्ति** - अनेक कुटिल मार्गांनी भ्रान्त होऊन भटकत राहतात; जसे एका आंधळ्याने दुसऱ्या आंधळ्याला वाहून न्यावे तसे.

### भावार्थ

जे अविद्येच्या अंधकारात राहतात, परंतु स्वतःला शहाणे आणि विद्वान मानतात ते अनेक वाकड्या-तिकड्या मार्गांनी भ्रान्त होऊन भटकत राहतात.

## || मंत्र ६ ||

**न साम्परायः प्रतिभाति बालं**
**प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ।**
**अयं लोको नास्ति पर इति मानी**
**पुनः पुनर्वशमापद्यते मे ।।६।।**

### अन्वयार्थ

अविवेकी, आणि धनाच्या झगझगाटाने मोहित झालेल्या बालबुद्धीच्या मूढ मानवाला; **साम्परायः न प्रतिभाति** - यानंतरचा परलोकीचा मार्ग स्पष्ट दिसत नाही; **अयं लोकः परः न अस्ति इति मानी** - 'हाच काय लोक, दुसरा लोक नाहीच,' असे जो मानतो; **(सः) पुनः पुनः मे वशम् आपद्यते** - तो पुनःपुन्हा माझ्या (मृत्यूच्या) अधीनतेत सापडतो (पुनर्जन्म घेतो).

### भावार्थ

जो बालबुद्धीचा आणि धनाच्या झगमगाटाने मोहित झालेला असतो तो 'हाच काय तो लोक, दुसरा लोक नाहीच,' असे मानतो, त्याला माझ्या अधीनतेत पुनःपुन्हा सापडावे लागते.

श्रेय आणि प्रेय ही दोन्ही वेगळी आहेत. श्रेयालाच विद्या असे दुसरे नाव आहे व प्रेयाला अविद्या असे नाव आहे. प्रकाश आणि अंधार, स्वर्ग आणि नरक, पाप आणि पुण्य हे जसे परस्पराहून भिन्न आणि विरोधी फळे देणारे आहेत, तशीच ही विद्या व अविद्या. विद्या ही मोक्ष देते तर प्रेयस हे पुनःपुन्हा जन्ममरणरूपी संसार देते. विद्या ही मुक्ती आहे तर अविद्या हे बंधन आहे. हे नचिकेता, तू ह्या मायिक प्रवृत्तीच्या मागे न लागता स्वतःच्या कल्याणाचा श्रेयस मार्ग निवडलास त्यामुळे तू धन्य आहेस.

अविद्यारूप स्वीकारलेले मूर्ख लोक स्वतःला शहाणे समजून भ्रान्त बुद्धीने जगत असतात. मृगजळाच्या मागे धावणाऱ्यांची तृष्णा कधी पूर्ण होते का? कस्तुरीमृगाप्रमाणे सुगंधासाठी वणवण भटकणाऱ्या व शेवटी स्वतःचा नाश ओढवून घेणाऱ्या प्राण्याप्रमाणे अशांची गत होते. कस्तुरीमृगाला शेवटचे श्वास घेताना जेव्हा त्याची मान बेंबीजवळ जाते तेव्हा सुगंध आपल्यातच दडला आहे याचे ज्ञान होते, पण तोपर्यंत वेळ निघून गेलेली असते. अविद्येच्या पाशात गुंतलेल्या माणसाचेही असेच होते. भोगामध्ये रुतलेल्या माणसाचा



पाय हा अधिकाधिक खोल जात असतो. एकामागून एक एक पाशाने तो बद्ध होतो. आत्मसुखाचा झरा आपल्याच अंतःकरणात असून तो मात्र सुखासाठी निरनिराळ्या विषयांच्या मागे धावत असतो. असा माणूस सुखाचा बुरखा पांघरणाऱ्या दुःखांनाच कवटाळत असतो. आंधळ्यावर विसंबून राहणारा जसा खड्ड्यात पडत असतो तसे हे लोक स्वतःचा आत्मघात करून घेत असतात. असे लोक जेव्हा इतरांना मार्गदर्शन करीत असतात त्या वेळी एक आंधळा जसे दुसऱ्याला मार्ग दाखवितो, तशी दोघांची स्थिती होते. दोघेही दिशाहीन होऊन भरकटत जातात. आपले स्वतःचे सत्यस्वरूप न ओळखल्यामुळे परिणामी ते दुःखी होतात. या मोहांच्या अधीन होणारा माणूस हा शेवटी जरा, मरण, रोग याच्या अधीन होऊन मोक्षापासून वंचित होतो.

भौतिक सुखाच्या मागे लागलेल्या या विषयांध लोकांना परलोकाचा विचार करायला उसंतच मिळत नाही. बुद्धी आणि मन ही विवेकहीन झाल्यामुळे आपल्या शरीर-मन-बुद्धीच्या पलीकडे तो कशाचाच विचार करत नाही. क्षणिक सुखाने भ्रान्त झालेले मानव जाणिवेच्या पातळीवरील जीवनाला सर्वस्व मानून जगत असतात. दिव्यतर जीवनाचे ध्येय नसल्यामुळे पुण्यलोक, पुनर्जन्म इत्यादींचा ते विचारच करीत नाहीत. त्यामुळे असे लोक जन्ममरणाच्या तडाख्यात वरचेवर सापडतात. नचिकेता, तुझ्यासारखा विवेकी मनुष्य खरोखरच दुर्मिळ आहे, म्हणूनच तू दुर्लभ, दुस्तर अशा आत्मज्ञानाची मागणी करतो आहेस.

## || मंत्र ७ ||
## आत्मज्ञानाची प्रशंसा

**श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः**
**शृण्वन्तोऽपि बहवो यं न विद्युः ।**
**आश्‍चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धा**
**आश्‍चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः ।।७।।**

### अन्वयार्थ

**श्रावणाय अपि बहुभिः यः लभ्यः** - ज्या आत्मतत्त्वाविषयी पुष्कळांना श्रवण करण्याचीही संधी मिळत नाही त्यासंबंधी श्रवण करूनही अनेकांना त्याचे (आत्म्याचे) आकलन होत नाही; **अस्य कुशलः वक्ता (अपि) लब्धा आश्‍चर्यः** - जो आत्मतत्त्वासंबंधी निपुणतेने प्रवचन करू शकतो तो मिळणे

खरोखर आश्चर्यच समजावे. निपुण आचार्यांनी शिकविल्यावर जो आत्मतत्त्व जाणतो तोही आश्चर्यकारक म्हणायचा.

### भावार्थ

जे बहुतेकांना ऐकावयासही मिळत नाही. बहुतेकांना ऐकूनही समजत नाही त्या आत्मतत्त्वाचे निरूपण करणाराही आश्चर्यरूप (विरळ) असून ते ऐकून जाणून घेणाराही एक आश्चर्यच (विरळाच) आहे.

## ।। मंत्र ८ ।।

**न नरेणाबरेण प्रोक्त ऐष**
**सुविज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः ।**
**अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्ति**
**अणीयान्ह्यतर्क्यमणुप्रमाणात् ।।८।।**

### अन्वयार्थ

सामान्य बुद्धीच्या पुरुषाकडून जेव्हा या आत्मतत्त्वासंबंधीचे निरूपण केले जाते, तेव्हा ते चांगल्या रीतीने समजण्यास सोपे नसते; **(यस्मात्) (अस्ति) बहुधा चिन्त्यमानः** - (कारण) त्याचा निरनिराळ्या प्रकारे विचार करावा लागतो; जो 'ब्रह्माशी' एकनिष्ठ झालेला आहे अशाकडून जेव्हा त्याचे निरूपण होते तेव्हा त्याबद्दल काही संदेह राहत नाही; (अस्तिनास्ति रूपाबद्दल). **(आत्मा) अणुप्रमाणात् अणीयान् अतर्क्यम् ही (अस्ति)** - आत्मतत्त्व सूक्ष्माहून सूक्ष्म असते आणि म्हणून ते युक्तिवाद करून संपादन करता येत नाही.

### भावार्थ

अनेक प्रकारांनी वर्णन केला गेलेला हा आत्मा सामान्य बुद्धीच्या माणसाला सांगूनही कळत नाही. अद्वैतावर आरूढ झालेल्या आचार्यांनीच उपदेश करायचे हे आत्मज्ञान 'आहे-नाही' अशा प्रकाराने समजत नाही, कारण ते तर्काला न कळणारे आहे.



## ।। मंत्र ९ ।।

**नैषा तर्केण मतिरापनेया**
**प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ ।**
**यां त्वमापःसत्यधृतिर्बतासि**
**त्वादृङ्नो भयान्नचिकेतः प्रष्टा ।।९।।**

### अन्वयार्थ

हे ज्ञान युक्तिवादाने मिळवावयाचे नसते; **अन्येन एव प्रोक्ता सुज्ञानाय (भवति)** - परंतु अनन्यत्व प्राप्त झालेल्याने जर ते शिकविले तर ते समजण्यास सोपे असते. हे परमशिष्या नचिकेता; ती तू आता (नराने) मिळविली आहेस, त्यामुळे तो तू सत्यतत्त्वात स्थित आहेस; **त्वादृक् प्रेष्टा नः भूयात्** - तुझ्यासारखा पृच्छा करणारा आम्हाला लाभो.

### भावार्थ

हे अत्यंत प्रिय नचिकेता, योग्य ज्ञानासाठी शास्त्र व आचार्य यांनी प्रतिपादिलेली ही बुद्धी म्हणजे विचार जो तुला लाभला आहे, तो केवळ कोरड्या तर्कांच्या योगाने प्राप्त होत नाही. अहाहा, तुझी धारणा सत्यपूर्ण आहे. तुझ्यासारखा विचारणारा आम्हास वारंवार प्राप्त होवो.

आत्मज्ञानाचे श्रवण अतिशय दुर्मिळ असते. जीव म्हणजे काय? जगत म्हणजे काय? जगदीश्वराचे स्वरूप कसे आहे? आपल्यातले प्राणतत्त्व, आत्मा हा त्याचाच अंश असल्यामुळे त्याचे स्वरूप कसे आहे? मी म्हणजे कोण? अशा अनेक प्रश्नांनीयुक्त असे आत्मज्ञान देणारा गुरूही समर्थ असला पाहिजे. असा श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ गुरूच आत्म्याचे उत्तम प्रकारे निरूपण करू शकतो. स्वतः आत्मरूप होऊनच हे ब्रह्मज्ञान देणारा आचार्य जसा दुर्मिळ असतो तसेच तो ऐकणारा श्रोताही दुर्मिळ असतो. गीतेमध्ये सातव्या अध्यायातील तिसऱ्या श्लोकात भगवान श्रीकृष्णांनी या विषयीचे वर्णन केले आहे.

**'मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन् मां वेत्ति तत्त्वतः ।।'**

'अर्जुना, हजारो लोकांमध्ये एखादाच आतमलाभासाठी प्रयत्न करीत असतो, आणि अशा प्रयत्न करणाऱ्या हजारोंपैकी एखादाच मग सर्वात्म्याला यथार्थभावे जाणण्यास समर्थ होत असतो.

आत्मलाभ प्राप्त करून घेण्यासाठी असणारी पात्रता हजारो मनुष्यांमध्ये एखाद्यासच असते व सत्य तत्त्वाची आंतरिक अनुभूती घेऊन हे ज्ञान सांगणारे खरे गुरू हे अतिशय दुर्मिळच आहेत. प्रेय मार्गाने जाणाऱ्या मनुष्याला हे तर केवळ दुर्मिळ असते. त्याच्या कानी जरी हे ज्ञान पडले तरी पाप बुद्धीने मलिन झालेल्या अंतःकरणात अशा आत्मज्ञानाचा गंधही स्थिर होत नाही.

अशा प्रकारचे आत्मज्ञान सामान्य बुद्धीच्या माणसांना आवाक्याबाहेरील असते. आत्मा जाणून घेण्यासाठी आंतरिक चित्तशुद्धी व्हावी लागते. शुद्ध सत्त्वगुणाची प्रकृती व्हावी लागते. विषयापासून पूर्णपणे अनासक्त असणारा साधकच हे ज्ञान घेण्यास प्राप्त होऊ शकतो. आत्मज्ञान सूक्ष्माहून सूक्ष्म असल्यामुळे ते देणारा हा ब्रह्मनिष्ठ व आत्मानुभूती घेतलेला आचार्य असावा लागतो. एखादाच ज्ञानी पुरुष ईश्वरदर्शी असतो. अशा आत्मज्ञानी आचार्यांने जेव्हा हे ब्रह्मज्ञान सांगितलेले असते त्या वेळी मनातील सर्व संशयांचे निराकरण होते. हे ज्ञान केवळ तर्काने जाणता येत नाही. सूक्ष्मातील सूक्ष्म बुद्धीच हे ज्ञान ग्रहण करण्यासाठी लागते. जिथे तर्क जाऊ शकत नाही तिथे श्रद्धाच जाऊ शकते. तार्किकाला आत्मज्ञान होणे शक्य नाही, पण श्रद्धेचे सामर्थ्य अपार असते. आत्म्यासंबंधी अनेक वादप्रवाद आहेत. एक आत्मा कर्ता आहे असे म्हणतात तर दुसरे त्याला अकर्ता समजतात. एकाला तो शुद्ध दिसतो तर दुसऱ्याला तो अशुद्ध वाटतो. काहीजण त्याचे अस्तित्व मानतात तर काहीजण त्याचे अस्तित्व झिडकारतात. अशा अनेक वादांनी व संशयांनी घेरलेले हे ज्ञान देण्यास केवळ समर्थ आचार्य हेच पात्र असतात. आत्मानुभूती प्राप्त झालेले व आत्मरूपच होऊन राहिलेले जेव्हा याविषयीचे निरूपण करतात तेव्हा श्रोत्याला ते निःशंक करतात. गाढ श्रद्धेने श्रवण करून गुरूसारखे 'मी तोच आत्मा आहे' असा प्रत्यक्ष अनुभव ज्याला येतो असे शिष्यही दुर्मिळच असतात. पण असे आत्मज्ञान एकदा झाले की मग अविद्या पुन्हा कधीच अनुभवाला येत नाही. त्यानंतर अभ्यासाची ही साधना करावी लागत नाही असे हे ज्ञान तर्कांनी, विचारांनी व ग्रंथाध्ययनाने होत नाही.

म्हणून ९ व्या मंत्रात यमदेव आपल्या या महान शिष्याच्या गुणांची स्तुती करीत आहेत. नचिकेत सर्व कसोट्यांना पार करून ही ब्रह्मविद्या प्राप्त करून घेण्यास अधिकारी शिष्य झाला आहे. आत्मज्ञान करून घेण्यासाठी जी अलौकिक बुद्धी व धैर्य लागते ते नचिकेताजवळ आहे, म्हणून गुरुमुखाने बोध करून घेण्यास तो ज्ञानाचा अधिकारी झाला आहे. असे शिष्य लाभावेत म्हणून आचार्य इच्छा करीत असतात.



## ।। मंत्र १० ।।

## नचिकेत अग्नीची उत्पत्ती

**जानाम्यहं शेवधिरित्यनित्यम्**
**नह्यध्रुवैः प्राप्यते हि ध्रुवं तत् ।**
**ततो मया नचिकेतश्चितोऽग्निः**
**अनित्यैर्द्रव्यैः प्राप्तवानस्मि नित्यम् ।।१०।।**

### अन्वयार्थ

**जानामि अहम् शेवधिः इति अनित्यम्** - कर्मफलरूप संपत्ती अनित्य असते असे मी जाणतो; **न हि अध्रुवैः तत् ध्रुवम् प्राप्यते** - (कारण) जे शाश्वत असते ते कधीही नाशवंत साधनांनी प्राप्त करून घेता येत नाही; **ततः मया अनित्यैः द्रव्यैः नचिकेतः अग्निः चितः** - (तरीसुद्धा) मी पश्वादी अनित्य द्रव्यांनी नचिकेत अग्नी प्रसन्न करून घेतला आहे; **नित्यम् प्राप्तवान अस्मि** - (आणि) मी 'शाश्वततत्त्वा'ची प्राप्ती करून घेतली आहे.

### भावार्थ

मला ठाऊक आहे की, कर्माची फलरूप संपत्ती अनित्य आहे. कारण अनित्य साधनाने नित्याची प्राप्ती कधीच होत नाही. मीही अनित्य असे नचिकेताग्नीचे साधन केल्याने मला (तत् सापेक्ष) 'यमत्वाचे' नित्य फळ मिळाले.

## ।। मंत्र ११ ।।

**कामस्याप्तिं जगतः प्रतिष्ठाम्**
**क्रतोरनन्त्यमभयस्य पारम् ।**
**स्तोमं महदुरुगायं प्रतिष्ठां दृष्ट्वा**
**धृत्या धीरो नचिकेतोऽत्यस्राक्षीः ।।११।।**

### अन्वयार्थ

**(त्वं तु) कामस्य आप्तिम्** - सर्व कामनांची प्राप्ती; **जगतः प्रतिष्ठा** - जगताचे (अध्यात्म, अधिभूत आणि अधिदैवी) आश्रयस्थान; **क्रतोः फलम्** -

यज्ञयागादी कर्माची अनंत फले (हिरण्यगर्भपद) **अभयस्य पारम्** - अभयाची परा मर्यादा; **स्तोम् (च) महत उरूगायम् प्रतिष्ठां दृष्ट्वा** - स्तुत्य आणि महान (अणिमादी ऐश्वर्ययुक्त) विस्तीर्ण गती (तसेच) आत्म्याची स्थिती पाहूनही; **नचिकेतः** - हे नचिकेता; **धीरः धृत्या अत्यस्त्राक्षीः (असि)** - तू विद्वान असल्यामुळे त्या सर्वांचा अव्हेर केला आहेस.

### भावार्थ

हे नचिकेता! तू मात्र बुद्धिमान होत्साता श्रेष्ठ भोग, लौकिक प्रतिष्ठा, यज्ञाचे अपार फलित, सर्वश्रेष्ठ अभय (अमरत्व) स्तुती व महत्त्व, मोठे राज्य ह्या सर्वांचा त्याग केला आहेस.

कोणत्याही कर्माचे फळ नाशवंतच असते. स्वर्गादि सप्तलोकांना जे नित्य म्हटले जाते ते केवळ रूढार्थाने. नित्य म्हटले जाते पण वस्तुतः स्वर्गातल्या भोगांनासुद्धा मर्यादा आहे. ज्या वेळी पुण्यक्षय होतो त्या वेळी पुन्हा भूलोकी यावे लागते. फक्त भूलोकीच्या काळापेक्षा या लोकातील काळ हा दीर्घ असतो. जे कर्म केले जाते तेसुद्धा नाशवंत साधनांनीच, त्यामुळे अशा नाशवंत साधनांनी केलेल्या कर्माचे फळसुद्धा नाशवंतच असते. त्यामुळे अनित्य वस्तूंच्या साधनांनी शाश्वतपद प्राप्त होत नाही. यमदेवानी नचिकेताग्नी प्राप्त केला. दान होमादिसह यमदेवानी नचिकेताग्नींचे चयन केले असता त्यांना हे यमलोकाचे यमपद प्राप्त झाले.

११ व्या मंत्रात यमदेव नचिकेताच्या अलौकिक गुणांची प्रशंसा करीत आहेत. नचिकेताने सर्व ऐहिक भोग, ऐश्वर्य, मोह या सर्वांचा त्याग करून स्वर्गफळाचीसुद्धा आशा केली नाही. नचिकेताने आत्मज्ञान मिळविण्यासाठी जितके म्हणून वैराग्य अंगी बाणवता येईल तेवढे धारण करून सर्व विषयांचा त्याग केला. लोकेषणा, वित्तेषणा अशा सर्व ईषणांचा निरास करून आपल्या बुद्धिमत्तेच्या बळावर मोठ्या धैर्याने त्याने या अनित्य गोष्टींचा त्याग केला. मृत्युलोकात प्रत्येक मनुष्याचे ध्येय हे आत्मज्ञान करून घेण्यातच असते, यालाच 'ब्रह्मलोक' किंवा 'हिरण्यगर्भ' अवस्था प्राप्त करून घेणे म्हणतात. श्रीशंकराचार्यांच्या दृष्टीने नचिकेताने ज्याचा त्याग आणि समर्पण केले होते ती हिरण्यगर्भ अवस्था होय. तीच समष्टि मनाची एकात्मता. नचिकेतामधील ही उच्च कोटीची खरी साधकता पाहून त्याच्या विवेकशक्ती आणि वैराग्य भावनेची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. म्हणून अशा दैवीगुणसंपन्न नचिकेताला आपला शिष्य म्हणून स्वीकारले.



## ।। मंत्र १२ ।।

## आत्म्याचे वर्णन (यमकृत)

**तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टम्**
**गुहाहितं गह्वरेष्ठं पुराणम् ।**
**अध्यात्मयोगाधिगमेन देवं**
**मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ।।१२।।**

### अन्वयार्थ

**तम् दुर्दशम्** - ज्याचे अवलोकन करणे कठीण असते (त्याला); **गूढम् अनुप्रविष्टम्** - जे (हृदय) गुहेत प्रविष्ट असते (त्याला); **गुहाहितम् गह्वरेष्ठम्** - हृदय गुहेत लपलेले, अतिखोल विवरात राहते त्या; **पुराणम् देवम्** - पुराण पुरुष भगवानाला; **अध्यात्मयोगाधिगमेन मत्वा** - अध्यात्मचिंतनाने - योगाने जाणल्यावर; **धीरः हर्षशोकौ जहाति** - विद्वान पुरुष हर्ष आणि शोक सोडून जातो.

### भावार्थ

त्या दुर्गम, गूढस्थाननिवासी, बुद्धिस्थ सूक्ष्म अशा पुरातन देवाला अध्यात्मयोगाने जाणून बुद्धिमान पुरुष हर्षशोकातीत होतो.

## ।। मंत्र १३ ।।

**एतच्छुत्वा संपरिगृह्य मर्त्यः**
**प्रवृह्य धर्म्यमणुमेतमाप्य ।**
**स मोदते मोदनीयं हि लब्ध्वा**
**विवृतं सद्म नचिकेतसं मन्ये ।।१३।।**

### अन्वयार्थ

**एतत् (आत्मतत्त्वम्) श्रुत्वा संपरिगृह्य(च)** - हे आत्मतत्त्वज्ञान ऐकल्यावर आणि उत्तम तऱ्हेने जाणून घेतल्यावर; **सः मर्त्यः** - तो मर्त्य मानव; **धर्म्यम् प्रवृह्य** - धर्मी आत्म्यास (देहादी संघातापासून) दूर करून; **एतम् अणुम् आप्य**

- ते सूक्ष्मतत्त्व प्राप्त करून; **(तथा) मोदनीयम् हि लब्ध्वा** - तसेच मोद निर्माण करणाऱ्या त्या आत्मतत्त्वाची प्राप्ती झाल्यामुळे; **मोदते** - आनंदित होतो; **नचिकेतसम् सद्म विवृतं (इति) (अहं) मन्ये** - नचिकेताला ब्रह्माचे निवासस्थान सताड उघडे झाले आहे असे मला वाटते.

### भावार्थ

हे आत्मज्ञान ऐकून आणि उत्तम रीतीने त्याचे ग्रहण केल्यानंतर मनुष्य आत्म्याला देहादि उपाधीपासून निराळा करून मोक्षधर्मदायक अशा निरूपाधिक अति सूक्ष्म व आनंदरूप आत्म्याची प्राप्ती करून घेऊन सुखरूप होतो. हे नचिकेता, तुला आता त्याच्या प्राप्तीचे दारच उघडले आहे असे मी समजतो.

यमदेव १२ व्या मंत्रापासून नचिकेताच्या मनातील प्रश्नांना उत्तरे देत आहेत. कठोपनिषदाच्या मुख्य विषयाचा आरंभ या मंत्रापासून होतो. आत्मलाभाचा सिद्धांत व तो आत्मलाभ कसा करून घ्यावा या संबंधीची चर्चा या मंत्रापासून सुरू होते. परोक्ष साक्षात्काराने आपल्याच देहामध्ये असलेल्या त्या परमपित्याच्या शक्तीला जाणून 'मी त्या परमपित्याचाच अंश आहे' याची अनुभूती घेऊ शकतो. आत्मा सूक्ष्माहूनही सूक्ष्म असून तो जणू या देहात लपून राहिला आहे. तो आत्मा बुद्धीरूप गुहेत राहत असून तिचे द्वार मन व चित्ताने झाकून टाकले आहे. 'कामक्रोधादि आड पडले पर्वत । राहीला अनंत पलीकडे ।।' या संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे या गुहेच्या वाटेवर अनंत जन्मांच्या संस्कारांची पुटे, स्थूल-सूक्ष्म-कारण अशा तीन देहांचे आवरण, कामक्रोधरूपी विकार शिवाय अधिभूत, अधिदैव व आध्यात्मिक असे त्रिविध ताप, पंचक्लेश भरलेले आहे. हे सर्व पार केल्याशिवाय व अंतःकरणशुद्धी झाल्याशिवाय या गुहेत शिरकाव करता येत नाही. चित्त जेव्हा निर्विकार, निर्विषय होते त्या वेळीच ही आत्मानुभूती येऊ शकते. वास्तविक जीव हा मुळातच शिवस्वरूप आहे पण अनेक आवरणांनी युक्त असलेला केळीचा गाभा जसा दडलेला असतो तसा आत्मा या सर्व विषय विकारांच्या आवरणानी या गुहेत लपलेला असतो. या एकेक पाकळ्या दूर केल्याशिवाय त्याचे दर्शन होत नाही. व एकदा का त्याची अनुभूती आली की मग तो हर्ष व शोकाच्या पलीकडे जातो. समदृष्टीने तो जगाकडे पाहतो व शाश्वत शांतीचा अनुभव करतो. आत्मतत्त्व किंवा हे शिवत्व अशा अध्यात्म साधनेने प्राप्त करता येते. ध्यानसाधना, योगसाधना याच्या बळावर स्वतःमध्ये असलेल्या या देवत्वाची आंतरिक अपरोक्ष अनुभूती अशा साधनेने घेता येते. असा आत्मवान झालेला



पुरुष जीवनातील सर्व द्वंद्वावर विजय मिळवतो. या संबंधीचे वर्णन १३ व्या मंत्रात केले आहे.

असे हे आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर त्याला कोणतीच देहादि उपाधी छळत नाही. सर्व क्लेशापासून मुक्त झालेला तो साधक आत्मानंदात डुंबत असतो. सर्व आनंदाचे उगमस्थान त्याला प्राप्त झाल्यामुळे त्या सच्चिदानंद अवस्थेची तो अनुभूती घेतो. सर्वव्यापी, सर्वपूर्ण, शाश्वत असे शुद्ध जाणीवतत्त्व जे आहे यापेक्षा दुसरे काहीही नाही व ते आत्मतत्त्व आपल्यातच आहे याचा तो अनुभव घेतो.

## ।। मंत्र १४ ।।
## नचिकेताचा प्रश्न

**अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मादन्यत्रास्मात् कृताकृतात्**
**अन्यत्र भूताच्च भव्याच्च यत्तत् पश्यसि तद् वद ।।१४।।**

### अन्वयार्थ

(नचिकेत म्हणाला) **यत्** - जे सद्गुणाहून भिन्न तसेच असद्गुणाहूनही भिन्न; (तथा) **अकृतात** - तसेच कार्य - कारणरूप प्रपंचाहून भिन्न; (तथा) **अन्यत्र भूतात् भव्यात् च** - (तसेच) भूत आणि भविष्यकालापासून भिन्न (काल - परिच्छिन्न); **यत तत् (वस्तुं) पश्चसि** - अशा ज्या वस्तूस (तू) पाहतोस; **तत् वद्** - ते मला समजावून सांग.

### भावार्थ

(नचिकेत म्हणाला), 'धर्म किंवा अधर्म, कार्य किंवा कारण, भूत, वर्तमान किंवा भविष्य या तीन काळांच्या अतीत असलेले असे जे तत्त्व तू जाणतोस, ते तू मला सांग.'

यमदेवाच्या प्रशंसेनंतर नचिकेत पुन्हा एकदा आपली तीच मागणी यमदेवाकडे करीत आहे. अगदी सरळ प्रश्न न विचारता थोडेसे आडमार्गाने आत्मज्ञानाचीच मागणी करीत आहे. जे धर्माधर्म म्हणजे सद्गुण आणि दुर्गुण अनुष्ठानाच्या पलीकडचे आहे, जे जे कार्यही नव्हे वा कारणही असत नाही, आणि जे भूतकाळही नव्हे वा भविष्यासंबंधीचे नव्हे अशा सत्य तत्त्वासंबंधीची त्याची मागणी आहे. अगदी स्पष्टपणे म्हणावयाचे तर नचिकेत येथे त्या शुद्ध जाणीव

तत्त्वाची, चैतन्य तत्त्वाची, सर्वसाक्षी, शाश्वत प्रकाश तत्त्वाची पृच्छा करीत आहे. या आत्म्याच्या स्वरूपाचेच हे वर्णन आहे. भूत, भविष्य आणि वर्तमान या अनादि त्रिकूटाहून वेगळा आहे. अनंत कोटी ब्रह्मांडाला उपादान कारण जगत् रूपाने प्रत्ययाला येणारे हे संपूर्ण कार्य आणि उत्पत्ती, स्थिती व लय या सर्वांहून निराळा असणारा असा जो आत्मा आहे, ज्याची अनुभूती आपण घेतलेली आहे त्याचे ज्ञान आपण मला द्यावे. असे नचिकेताने यमदेवाला सांगितले. धर्मकर्तव्ये किंवा कर्मांची फले याचे ज्ञान आपल्याला नको आहे, पण जे काल आणि कारण याच्या पलीकडचे आहे असे शाश्वत तत्त्व यमदेवानी आता सांगावे.

## ।। मंत्र १५ ।।

## यमराजाचे उत्तर व ओंकाराचा उपदेश

**सर्वे वेदा यत् पदमामनन्ति**
**तपांसि सर्वाणि च् यद् वदन्ति ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति**
**तत् ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ।।१५ ।।**

### अन्वयार्थ

(यमराज म्हणतात,) **सर्वे वेदाः यत् पदम् आमनन्ति** - सर्व वेद ज्याचे गमनीय स्थान म्हणून प्रतिपादन करतात, ज्याच्याकरिता सर्व प्रकारची तपे सांगितली जातात, ज्याची इच्छा करून ते ब्रह्मचर्य पाळतात; **तत् पदम् ते संग्रेहण ब्रवीमि** - ते पद मी तुला थोडक्यात सांगतो.

### भावार्थ

सर्व वेद ज्या पदाचे वर्णन करतात, सर्व तपे ज्याच्या प्राप्तीची साधने आहेत, ज्याच्या प्राप्तीसाठी (मुमुक्षु) ब्रह्मचर्य पाळतात ते मी तुला थोडक्यात सांगतो. ओम् हेच ते पद होय. चारी वेद ज्याचे वर्णन करतात, सर्व तपे जेथे पोहोचवितात व ज्यासाठी अधिक ब्रह्मचर्य व्रताचे पालन करतात - ते मिळविण्यासाठी सहा अंगांचे पूर्ण ते आचरण करीत जी श्रीगुरुसेवा केली जाते, त्यालाच ब्रह्मचर्य असे नाव आहे. धर्म-अधर्म तीन काल व कार्यकारण ह्यांचे पलीकडे आहे ते तुला सांगतो.



## ।। मंत्र १६ ।।

**एतध्येवाक्षरं ब्रह्म ह्येतदेवाक्षरं परम्**
**एतध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ।।१६।।**

### अन्वयार्थ

**एतत् एव अक्षरम् ब्रह्म** - ओम् हे अक्षर हेच ब्रह्म आहे; **एतत् हि एव अक्षरम् परम्** - आणि हे अक्षरच परम (तत्त्व) आहे. यालाच अक्षरतत्त्व जाणून; **यः यत् इच्छति** - जो ज्याची जशी (पर वा अपर) इच्छा करतो; **तत् तस्य (भवित)** - तो ते प्राप्त करून घेतो.

### भावार्थ

हेच (ओम) अक्षर ब्रह्म आहे. हेच अविनाशी श्रेष्ठ तत्त्व आहे. या अक्षरालाच जाणले असता जो जी इच्छा करतो ती त्याला मिळते.

## ।। मंत्र १७ ।।

**एतदालम्बनं श्रेष्ठमेतदालम्बनं परम्**
**एतदालम्बनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महियेते ।।१७।।**

### अन्वयार्थ

**एतत् आलम्बनम् श्रेष्ठम्** - हे ओमकाररूपी आलंबन (ब्रह्मप्राप्ती) सर्वात श्रेष्ठ आहे; **एतत् आलम्बनम् परम्** - हे आलंबन (परीत्पर ब्रह्मविषयामुळे) परमोच्च स्वरूपाचे आहे; हे आलंबन जाणून (तो साधक); **ब्रह्मलोके महियते** - ब्रह्मलोकात (स्थित होऊन) पूजनीय होतो.

### भावार्थ

हेच श्रेष्ठ आलंबन आहे, हेच परतत्त्वाचे आलंबन आहे. हे आलंबन जाणले असता पुरुष ब्रह्मलोकात मोठ्या पदाला पोहोचतो.

१५ व्या मंत्रापासून आत्मज्ञानाच्या एकेका महत्त्वाच्या अंगाचे विवरण यमराज आता करीत आहेत. भगवद्गीतेमध्ये या महत्त्वाच्या श्लोकाचे प्रतिबिंब उमटले आहे.

**ओम इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।८.१३।।**

ओम या एकाक्षरब्रह्माचा जप करीत जो माझे स्मरण करीत देह सोडून जातो त्याला उत्तम गती मिळते. या आठव्या अध्यायाप्रमाणेच १७ व्या अध्यायात २३ व्या श्लोकात ओम्‌चे माहात्म्य वर्णन केले आहे.

**ओमतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**

'परब्रह्माचा ओमत्-सत् असा तीन प्रकारे निर्देश केला जातो.' ओमत्-सत् हा संकल्प सर्व सृष्टीचे मूळ होय. चारी वेदांनी याचे वर्णन केले आहे. या एकाग्रतेच्या साधनेसाठी ओंकाराचे म्हणजे ईश्वराच्या प्रतीकाचे निदिध्यासन करावे लागते. सर्व ज्ञान एक मुखाने ज्या गोष्टीचा उद्‌घोष करते, सर्व निष्काम तपे ही ज्याच्या प्राप्तीसाठी केली जातात, ज्याच्यासाठी तू व्याकुळ झाला आहेस त्या ईश्वराचे आलंबन, स्वरूप ओम् या अक्षरात एकवटले आहे. ओम् हे एक अक्षरच ब्रह्म आहे. अ, उ आणि म या तीन उच्चारांच्या एकतेत ईश्वराची सारी लीला, शक्ती सामावली आहे याच्या चिंतनाने ईश्वराचीच साधना होते. याचाच जप करून शांतीमय पूर्ण स्वरूप ईश्वराची प्राप्ती करून घेता येते. ओंकार हाच ईश्वराचा आविष्कार आहे. अखिल ब्रह्मांडात कोठेही जे तत्त्व म्हणून आहे ते ओंकार आहे. ओम् हे एकाच उपासनेकरिता आणि सगुण चिंतनाकरिता एकाचवेळी ध्येय निर्देषित करणारे ब्रह्माचे प्रतीक आहे.

१६ व्या मंत्रात यमराज ओम् या प्रतीकाची उपासना स्पष्ट करीत आहेत. याच एका अक्षरतत्त्वाने आत्म्याचे स्फुरण होते. वेदांनी ध्यान करण्यास ही प्रतीक उपासना सांगितली आहे. ओम् हे अक्षर निरपेक्ष सत्यतत्त्वाचे प्रतीक असल्यामुळे जो त्याचे श्रद्धापूर्वक चिंतन करील त्याला या ईश्वरतत्त्वाची अनुभूती येऊ शकते. ओम् ह्या अक्षरावर ध्याता ज्या ज्या हेतूने ध्यान करील ते ते त्याला प्राप्त होईल. अंतिमतत्त्व किंवा अमृततत्त्व मिळण्याकरता जो साधना करील त्याला ते सच्चिदानंद प्राप्त होईल. जो ओम् ह्या अक्षर प्रतीकाच्या ईश्वरीशक्तीचे ध्यान करून सत्यतत्त्वाशी ज्ञानाने एकरूप होतो व तशी अनुभूती घेतो तो स्वतःच ईश्वरमय होऊन पूर्णत्वाचा अनुभव घेतो. अशा तऱ्हेने भगवान यमराजाने कर्म आणि ज्ञान या दोहोंचेही निर्देशन केले आहे. ओंकाराची ब्रह्मभावाने उपासना करणाऱ्याला खरा जीवनमुक्तीचा सोहळा भोगावयास मिळतो. श्रेयस्वरूप परब्रह्मच ओंकाररूपी ज्ञेय असून ते यथार्थ जाणले असता जीवच ब्रह्म होतो.



## ।। मंत्र १८ ।।

## आत्मस्वरूप निरूपण

**न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं**
**कुतश्चिन्न बभूव कश्चित् ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे ।।१८।।**

### अन्वयार्थ

**विपश्चित् न जायते म्रियते वा** - हा मेधावी आत्मा जन्म पावत नाही वा मरतही नाही; तो कशापासूनही निर्माण झाला नाही; तो अजन्मा, नित्य, शाश्वत आणि पुरातन असून; **हन्यमाने शरीरे (सति) (सः) न हन्यत** - शरीर मेले तरी तो मारला जात नाही.

### भावार्थ

हा आत्मा जन्म पावत नाही वा मरत नाही, तो कशापासून निर्माणही झाला नाही व त्याच्यातूनही काही निर्माण होत नाही, तो अजन्मा, नित्य, शाश्वत आणि पुरातन आहे. मर्त्य शरीर मेले तरी तो मारला जात नाही.

## ।। मंत्र १९ ।।

**हन्ता चेन्मन्यते हन्तुं हतश्चेन्मन्यते हतम्**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ।।१९।।**

### अन्वयार्थ

**हन्ता चेत् मन्यते हन्तुम्** - मारणारा जर म्हणत असेल की, 'मी मारतो', **हतः चेत् मन्यते हतम्** - मेलेला म्हणत असेल की मी मारला गेलेला आहे; **उभौ तौ न विजानीतः** - तर त्या दोघांनाही बरोबर समजत नाही; **न अयम् हन्ति न हन्यते** - तो कोणाला मारतही नाही आणि मारलाही जात नाही.

### भावार्थ

मारणारा जर 'आत्मा मारीन' असे म्हणत असेल आणि मरणारा जर 'आत्मा मरतो' असे समजत असेल तर दोघेही आत्मा जाणीत नाहीत. कारण आत्मा मरतही नाही मारलाही जात नाही.

## ।। मंत्र २० ।।

**अणोरणीयान् महतो महीयान्**
**आत्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम् ।**
**तमक्रतुः पश्यति वीत शोको**
**धातुप्रसादान्महिमानमात्मनः ।।२०।।**

### अन्वयार्थ

**अणोः अणीयान्** - सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्मतर; **महतः महियान्** - मोठ्यापेक्षाही अधिक मोठा; **आत्मा** - आत्मा; **अस्य जन्तोः गुहायाम् निहितः** - प्रत्येक प्राणिमात्रांच्या हृदयगुहेत स्थित असतो; **अक्रतुः तम् धातुप्रसादात् आत्मनः महिमानम् पश्यति** - इंद्रियांच्या कृपेमुळे आशा-आकांक्षापासून मुक्त असलेला तो निष्काम पुरुष आत्म्याचे मोठेपण जाणतो; **वीतशोकः (भवति)** - आणि शोकरहित होतो.

### भावार्थ

सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्मतर, स्थूलापेक्षाही स्थूल आत्मा प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयगुहेत स्थित असतो. निष्काम पुरुष त्याचा (आत्म्याचा) महिमा जाणतो आणि शोकरहित होतो.

## ।। मंत्र २१ ।।

**आसीनो दूरं व्रजति**
**शयानो याति सर्वतः**
**कस्त मदामदं देवं**
**मदन्यो ज्ञातुमर्हति ।।२१।।**



### अन्वयार्थ

**आसीनः (सन्) दूरम् व्रजति** - हा (आत्मा) अचल असूनही दूरवर जाऊ शकतो; **शयानः याति सर्वतः** - शयन करीत असून सगळीकडे जातो; हर्षसहित आणि हर्षरहित अशा विरुद्ध धर्म असणाऱ्या त्या देवतांना माझ्याशिवाय कोण जाणू शकणार?

### भावार्थ

तो (आत्मा) स्थिर असूनही दूरवर जातो व झोपलेला असूनही सर्वत्र फिरतो. हर्षयुक्त व हर्षरहित त्या देवाला माझ्याशिवाय कोण जाणू शकेल?

## ।। मंत्र २२ ।।

**अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थि**
**महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ।।२२।।**

### अन्वयार्थ

जो शरीरामध्ये शरीररहित आणि नाशवंत देहात स्थित (रूपात) असा; **आत्मानम् महान्तम् विभुम् मत्वा** - महान सर्वव्यापी 'आत्मा' म्हणून पाहतो त्यानंतर; **धीरः न शोचति** - तो विद्वान पुरुष शोक करीत नाही.

### भावार्थ

जो शरीरात शरीररहित व अनित्यात नित्यरूपाने आहे, असा महान व सर्वव्यापी आत्मा जाणून बुद्धिमान पुरुष शोक करीत नाही.

१८ व्या मंत्राप्रमाणेच भगवद्गीतेतही दुसऱ्या अध्यायातील २० ते २५ अशा श्लोकामध्ये आत्म्याचे असेच हुबेहूब वर्णन आले आहे. बऱ्याच ठिकाणी शब्दरचनासुद्धा सारखीच आहे. २० व्या श्लोकात भगवान श्रीकृष्ण आत्म्याचे वर्णन करतात.

**न जायते म्रियते वा कदाचि -**
**न्नायं भुत्त्व भावता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे ।।२०।।**

हा (आत्मा) कधी जन्मत नाही किंवा मरतही नाही; हा एकदा होऊन

पुन्हा होणारा नाही असेही नाही; हा अज, नित्य, शाश्वत व पुरातन आहे, आणि शरीराचा वध झाला तरीही तो मारला जात नाही.

कठोपनिषदातील १८ व्या श्लोकातील शेवटच्या चरणातील शब्द जसेच्या तसे वरील श्लोकात आलेले आहेत. गीता हे उपनिषदांचे सारच असल्यामुळे अशी पुनरुक्ती अनेक ठिकाणी आढळून येते. भगवान यमदेव आत्म्याच्या स्वरूपाचे वर्णन करीत आहेत. यमराजानी स्वतः ही प्रत्यक्ष अनुभूती घेतलेली असल्यामुळे याचे महत्त्व अधिक आहे. आत्मा जन्मही पावत नाही अथवा मरतही नाही. सर्व नाशवंत, अनित्य वस्तूंमध्ये विकार संभवतात आणि सर्व विकार जन्म, वृद्धी, व्याधी, क्षय आणि मृत्यू अशा प्रकारात मोडतात. जे विकार पावते व नाश पावते ते अनित्य स्वरूपाचे असते. या मंत्रात 'विपश्चितः' हा शब्द या ठिकाणी आत्म्याचे विशेषण म्हणून वापरला आहे. याचा अर्थ प्रेरणा जाणणारा शुद्ध ज्ञानतत्त्वाच्या अनुभूतीतून जन्मलेला. आत्मा देहाप्रमाणे जन्मही घेत नाही आणि मृत्यूही पावत नाही. जसा कुंभार घट निर्माण करतो. घटामध्ये बाहेरील आकाश असतेच, ते काही पुन्हा जन्मत नाही आणि ज्या वेळी हा घट फुटतो त्या वेळी घटाचा नाश होतो, पण घटाकाश मूळ आकाशात विलीन झालेले असतेच. न जन्मलेल्या घटाकाशास मृत्यू नसतो त्याप्रमाणे आत्मतत्त्व हे कधीच जन्मत नाही व कधीही मरत नाही. देहाचा जन्म आत्म्यासह झाला पण देहाचे विकार त्यात नसल्यामुळे देह गेल्यानंतरसुद्धा तो असतोच. पाणी जसे बर्फाच्या रूपाने दिसते तसे आत्मतत्त्व जगताचे रूपाने दिसते असे नाही. कारण जग हे निराळे असे काही नाहीच. म्हणून आत्मा हा नित्य व शाश्वत असल्याने पूर्वी कधी होता, कधी नव्हता व पुढे असेल-नसेल असे म्हणता येत नाही. देह नष्ट झाल्यावरसुद्धा ते आत्मतत्त्व शिल्लक राहतेच.

१९ व्या मंत्रात आत्म्याचे हेच वर्णन सुरू आहे. आत्मा अविनाशी, नित्य, अज, अव्यय असल्यामुळे तो कधी मरतही नाही व कोणाला मारीतही नाही. देहाचे अस्तित्व असले तरी तो असतो व देह नाहीसा झाला तरी तो असतोच. जो आत्मा एका देहात आहे तोच अनेकांच्या देहात आहे. ज्या वेळी देहाची उत्पत्ती होते त्या वेळी हाच आत्मा चैतन्यरूप बनून देहाला कार्यप्रवृत्त करतो. जो मी मारणारा असे समजत असेल व जो मी मरणारा असे म्हणत असेल तर हे म्हणणे व्यर्थ आहे. सत्, चित् व आनंदरूप असा आत्मा नित्य व अविनाशी आहे.

**(मंत्र २० वा )** सूक्ष्मापेक्षाही सूक्ष्म आणि मोठ्यात मोठा असा हा आत्मा सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात निवास करतो. श्रुतीच्या वर्णनानुसार हे आत्मतत्त्व संपूर्ण जगतास व्यापते, त्याला कवटाळते आणि त्यानंतर आरपार जाते.



अखिल ब्रह्मांडाला ते व्यापून आहे याचे वर्णन करत असताना गीतेमध्ये भगवान श्रीकृष्ण या महान विभूमय आत्मस्वरूपाचे वर्णन करताना म्हणतात, **'विष्टभ्याहमिदं कृत्स्नकांशेन स्थितो जगत्'** (१०.४२). 'थोडक्यात सांगतो की, मी आपल्या एका(च) अंशाने हे सर्व जग व्यापून राहिलो आहे.' परमात्म्याच्या एका अंशाने हे जग व्यापले आहे तर त्याची संपूर्ण व्याप्ती किती अपार असेल याची मानवी बुद्धीला कल्पनाच करता येणार नाही. अमर्याद असे आकाशही त्याच्या व्याप्तीपुढे मर्यादित आहे. संपूर्ण जगत् जे नानारूपात्मक आहे ते केवळ या एकाच आत्मस्वरूपाच्या अंशावर राहते. अशा या आत्म्याची सूक्ष्मतासुद्धा कळण्यास कठीण आहे. मनुष्याच्या बुद्धीरूप गुहेत या आत्म्याचे अस्तित्व आहे. याच्याच शक्तीमुळे इंद्रियांना शक्ती मिळते. जो निर्विषयी, निर्विचारी, निष्काम, निरंहकारी, निस्पृह, अनासक्त व इंद्रियांवर विजय मिळविलेला असा झाला आहे तो या आत्म्याला जाणू शकतो. ज्याला जाणावयाचे तो आत्मा हेच माझे स्वस्वरूप आहे याची प्रत्यक्ष अनुभूती घेऊन तो शोकरहित होऊन अखंड आनंदात राहतो. अशी ही प्रसन्न अवस्था त्याला प्राप्त झाल्यामुळे त्याचे अज्ञान मिटते. अशा या प्रसन्न अवस्थेत तो आत्म्याची विशालता अनुभवतो. संत तुकारामांनी ही अवस्था अनुभवली म्हणून त्यांच्या मुखातून असे शब्द बाहेर पडले, 'अणूरेणु या थोकडा । तुका आकाशा एवढा ।।' आत्मस्वरूपाची प्रचिती आल्यानंतर संपूर्ण जगाकडे पाहण्याची समदृष्टी त्याला प्राप्त होते आणि 'विचरे विश्व होऊनी विश्वामाझी' असा तो जगात वावरायला लागतो.

**(मंत्र २१ वा)** असा आत्मा जेव्हा देहावर सत्ता गाजवितो त्या वेळी तो स्थित असतो. त्यामुळे तो स्थिरही आहे व गतीही घेणारा आहे. ब्रह्मरूपाने आत्मा एकच आहे पण नाना नामरूपादि उपाधीमुळे त्याने अनेकत्व घेतले आहे असे भासते. या उपाधी गतिशील असल्यामुळे आत्मासुद्धा असाच गतिशील आहे याचा भास होतो. अशा नामरूपात्मक देहाची उपाधी लागल्यामुळे त्या बुद्धीरूप गुहेत असणाऱ्या आत्म्यालासुद्धा सुखदुःख आहे असे आपण अज्ञानामुळे म्हणतो. या गुणमयी मायेच्या प्रांतात आत्मासुद्धा गुणमयी होऊन, या उपाधीप्रमाणे निरनिराळे भाव धारण करतो असे वाटते. देहाच्या ठिकाणी कुटस्थरूपाने असणारा आत्मा हा स्थिर असतो, पण मनाच्या गतिशीलतेमुळे त्याच्यात चांचल्य आहे असे वाटते. मन जिकडे धावेल तिकडे तो धावतो असाही भास वाटतो. अशा आत्म्याचे स्वरूप यमराजाशिवाय कोण बरे जाणणार? म्हणून नचिकेताला ते म्हणतात की, त्या आत्म्याला जाणणारा सूक्ष्म व शुद्धबुद्धी असणारा माझ्यासारखा एखादाच जाणतो.

**(मंत्र २२ वा)** मनुष्याची अविद्याग्रस्त अवस्था हीच त्याच्या शोकाला कारणीभूत असते. असा मनुष्य देहात्मकतेमुळे शरीर व सर्व इंद्रियांना आपले खरे स्वरूप हेच आहे असे जाणतो. आपल्या अहंभावामुळे त्याला देहच सर्वस्व आहे असे वाटते. पण या मर्त्यदेहामध्ये, या मृण्मय शरीरामध्ये कोणीतरी चिन्मय गुप्तरूपाने राहिला आहे हे त्याला बुद्धीने समजत नाही. आत्माविदेही आहे पण देहरूपात मात्र त्याचे अस्तित्व आहे. पण जेव्हा आत्मस्वरूपाचे ज्ञान होते त्या वेळी हे भ्रांतीयुक्त विचार नाहीसे होतात. 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' या न्यायाप्रमाणे जो आत्मा देहात असतो तोच आत्मा या विष्णूमय जगात ब्रह्मरूप होऊन व्याप्त झालेला असतो. संपूर्ण विश्व म्हणजे ते सच्चिदानंद ब्रह्मच होय. आत्मस्वरूपाचे जेव्हा ज्ञान होते त्या वेळी तो जगाकडे समभावाने बघतो त्यामुळे तो स्वतःच विश्वरूप बनतो. 'हे विश्वची माझे घर' अशी अवस्था झाल्यामुळे तो द्वेषरहित होऊन प्रेमरूपाने जगाकडे पाहतो. 'जे जे भेटे भूत, ते ते मानी जे भगवंत' अशी अवस्था प्राप्त झाल्यामुळे तो कशाचाही शोक करीत नाही. देहात असणारा मीच विश्वातही असल्याने शोक करावयाचे कारणच राहत नाही.

## || मंत्र २३ ||

## आत्मज्ञान आत्मकृपेनेच होते

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो**
**न मेधया न बहुधा श्रुतेन ।**
**यमेवैष वृणते तेन लभ्यस्तस्यैष**
**आत्या विवृणुते तनूं स्वाम् ।।२३।।**

### अन्वयार्थ

**अयम् आत्मा प्रवचनेन न लभ्यः** - हा 'आत्मा' काही वेदांच्या प्रवचनांच्या अभ्यासाने प्राप्त होत नाही; **न मेधया न बहुना श्रुतेन** - ना बुद्धिमान युक्तिवादाने ना अधिक श्रवणाने; **यम् एव एषः वृणुते** - जो साधक याच्याविषयीची केवळ प्रार्थना करतो; **तेन लभ्यः** - त्यालाच तो प्राप्त होतो. त्यालाच हा आत्मा आपले स्वरूप प्रगट करतो.



### भावार्थ

हा 'आत्मा' काही वेदांच्या अभ्यासाने वा युक्तिवादाने वा अधिक श्रवणाने प्राप्त होत नाही. जो याच्याविषयी प्रार्थना करतो त्यालाच तो प्राप्त होतो, त्यालाच तो आपले स्वरूप प्रगट करतो.

## || मंत्र २४ ||

**नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः**
**नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ।।२४।।**

### अन्वयार्थ

जो पापकर्मापासून निवृत्त झालेला नाही; **न अशान्तः** - ज्यांची इंद्रिये शमन पावली नाहीत; **न असमाहितः** - ज्याला मनाची एकाग्रता साधली नाही; **वा अशान्तमानसः** - किंवा ज्याचे चित्त अशांत असते (असा तो साधक) ज्ञानाने आत्मप्राप्ती करून घेऊ शकत नाही.

### भावार्थ

त्याने पापकर्म टाकले नाही, ज्याची इंद्रिये शांत झालेली नाहीत. तो नुसत्या ज्ञानाने आत्मा मिळवू शकत नाही.

## || मंत्र २५ ||

**यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भक्त ओदनः**
**मृत्युर्यस्योपसेचनं क इत्था वेद यत्र सः ।।२५।।**

### अन्वयार्थ

ज्या आत्म्याचे ब्राह्मण आणि क्षत्रिय हे जणू शिजविलेला तांदूळ (भात) होत; **यस्य मृत्यूः उपसेचनम् (भवति)** - मृत्यू हे ज्याचे शाकादी कालवण होय; **सः यत्र कः इत्था वेद** - असा तो (साधनसंपन्न अधिकारी) कोण आहे हे कसे जाणणार?

### भावार्थ

ज्या आत्मस्वरूपाला ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही भाताप्रमाणे असून मृत्यू हा भाजी-चटणीप्रमाणे आहे ते आत्मस्वरूप अनाधिकारी कसा जाणू शकेल.

**(मंत्र २३ वा)** म्हणजे एक सुभाषितांचे एक सुभाषितच आहे. वक्त्यांना, पंडितांना आपल्या निरूपणामध्ये उद्धृत करण्यात येणारा हा मंत्र आहे. ज्ञानेश्वर माऊलींनी म्हटले आहे -

**पैं तोंड भरो कां विचारा । आणि अंतःकरणीं विषयांसी थारा ।**
**तरी नातुडें धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ।।१५.९३।।**
**तैसा चित्तीं अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्रांचा सरावो ।**
**ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे मातें ।।१५.९६।।**

**अर्थ -** (अर्जुना, कितीही, विचाराने (ज्ञानाने) तोंड भरलेले असेना का? परंतु जर अंतःकरणामध्ये विषयांना आश्रय मिळत असेल, तर मी निश्चयेकरून सापडणार नाही.

त्याप्रमाणे चित्तामध्ये अभिमानाला जागा दिली आहे आणि जिव्हेला सर्व शास्त्रांचा अभ्यास झाला आहे अशा तऱ्हेने कोट्यवधी जन्म जाईनात का? परंतु अशा पुरुषास माझ्या स्वरूपाची प्राप्ती करून घेता यावयाची नाही.

जिभेवर साक्षात सरस्वतीदेवी जरी असेल म्हणजे सर्व शास्त्रे, वेद हे मुखोदगत् जरी असतील तरी अंतःकरणामध्ये जर विषयांचे आकर्षण व अहंकार असेल, तरी एक कोटीवेळा जरी जन्म घेतला तरी आत्मदर्शन होणे कधीही शक्य नाही, असे भगवंताचे मनोगत आहे. शुद्ध अंतःकरणातच भगवंताचे दर्शन घडते. श्रेय मार्गाने चालणाऱ्या साधकाची अंतःकरणशुद्धी झाल्यावर आत्मदर्शनाचा मार्ग मोकळा होतो. वृत्ती निष्काम झाल्या व भोगवृत्ती नाहीशी झाली की, आत्मसाक्षात्काराचा मार्ग मोकळा होतो. आत्मज्ञान तर्काने होऊ शकत नाही या परस्परविरुद्ध धर्मांची एकता ज्या ईश्वरामध्ये संभवते त्याच्या ज्ञानास उचित अशी सूक्ष्मता तर्क गाठू शकत नाही. ज्ञानमय श्रद्धा, विशुद्ध अंतःकरण व शमदमादि उपायाने हा आत्मा प्राप्त होतो. खूप श्रवणाने, कीर्तन-प्रवचनाने कितीही निरूपण केले तरी आत्मज्ञान प्राप्त होत नाही. ज्या आत्म्याला पाहावयाचे त्याच्याविषयी अव्यभिचारिणी भक्ती व अनन्यप्रेम जेव्हा निर्माण होते तेव्हाच त्याचे दर्शन होते. आत्मा हा नित्य प्राप्त आहे. आपले स्वस्वरूप तेच असल्यामुळे तो कोठेही दूर नाही. आंतर्बाह्य तोच व्यापून आहे अशा आत्म्याची जो सर्व भावे प्रार्थना करतो त्यालाच तो प्राप्त होतो.



**(मंत्र २४ वा)** २३ व्या मंत्रातील अर्थाला जोडूनच २४ वा मंत्र आहे. २३ व्या मंत्रात आत्मज्ञानाचा अधिकारी कोण होईल? हे सांगितले व २४ व्या मंत्रात आत्मज्ञानाचा अनाधिकारी कोण आहे? याचे वर्णन आहे. जे अधर्मापासून परावृत्त झालेले नाहीत, ज्यांनी इंद्रिय दमन केले नाही, ज्यांनी शास्त्र निषिद्ध कर्मे सोडलेली नाहीत, ज्यांची चित्तशुद्धी झालेली नाही, इंद्रिय विषयामध्ये जे रममाण होतात अशा अशांत प्रवृत्तीच्या लोकांना आत्मदर्शनापासून वंचित राहावे लागते. जिथे पाप कर्मे आहेत, द्वेष, मत्सर असे षड्रिपू जिथ आहेत आणि काम, क्रोध, लोभ यांचे जे गुलाम झाले आहेत अशा असुरी प्रवृत्तीच्या लोकांना ईश्वरदर्शनाचा लाभ होत नाही. संसारात आसक्त असलेले व रजतम् गुणांनी युक्त असलेले अनेकचित्तविभ्रांत असे चंचल लोक हा आत्मानंद प्राप्त करू शकत नाहीत.

**(मंत्र २५ वा) आत्म्याचे माहात्म्य**

धर्मरक्षणात अग्रेसर असणारे ब्राह्मण व सर्वांचे रक्षण करणारे क्षत्रिय हे दोघेही आत्मा भाताच्या मुदीप्रमाणे खातात. जीवाला सतत भिवविणारे, अटळ असणारे मरण हे तर आत्म्याला चटणी-कोशिंबिरीप्रमाणे आहे. तसा ब्राह्मण सत्त्वगुणी असूनही अहंभावामुळे तो आत्मा जाणत नाही व क्षत्रियसुद्धा मोह व मायेत अडकल्यामुळे आत्मज्ञानापासून पारखा होतो. मन व इंद्रिये यांना काबूत न आणणारा अशा विकारी माणसाला आत्म्याचा ठावठिकाणा कसा मिळेल!

***येथे प्रथम अध्यायावरील द्वितीय वल्ली समाप्त झाली.***

×××

# प्रथम अध्याय - तृतीय वल्ली

## ।। मंत्र १ ।।

## जीवात्मा व परमात्मा

**ऋतं पिबन्तौ सुकृतस्य लोके**
**गुहां प्रविष्टौ परमे परार्धे ।**
**छायातपौ ब्रह्मविदो वदन्ति**
**पञ्चाग्नयोयेच त्रिणाचिकेताः ।।१।।**

### अन्वयार्थ

(जे दोघे) शरीराच्या (बुद्धीरूप) गुहेत, ब्रह्मस्थानात बसून आपल्या सुकृताची कर्मफले भोगतात; **छायातपौ (इव) (विलक्षणौ)** - असे ब्रह्म जाणणारे त्यांना छाया आणि ऊन याप्रमाणे परस्पर विलक्षण; **ब्रह्मविदः वदन्ति** - म्हणतात; **पञ्च अग्नयः ये च त्रि नचिकेताः** - ज्यांनी नचिकेत अग्नीचे तीनदा चयन केले आहे त्यांना पंचाग्नीची उपासना करणारे (असे म्हणतात).

### भावार्थ

ब्रह्मज्ञानी असे सांगतात की, शरीरात (बुद्धीरूप) गुहेत असलेल्या ब्रह्मस्थानात राहून आपापले कर्मफळ भोगणारी छाया व उन्हाप्रमाणे परस्पर भिन्न अशी दोन (तत्त्वे) आहेत. हीच गोष्ट तीन वेळा नचिकेताग्नीचे चयन करणाऱ्यांनी व पंचाग्नी साधकांनीही सांगितली आहे.

## ।। मंत्र २ ।।

**यः सेतुरीजानानाम् अक्षरं ब्रह्म यत्परम् ।**
**अभयं तितीर्षतां पारं नाचिकेतं शकेमहि ।।२।।**



### अन्वयार्थ

**यः इजानानाम् सेतुः (इव)** - जे यज्ञयाग करतात त्यांना (परब्रह्माशी जोडणारा) सेतू होय. जो संसारसागर पार करणाऱ्या इच्छुकांना निर्भय असे परमब्रह्म आश्रयस्थान आहे; **(तम्) नाचिकेतम् (अग्निम्) (ज्ञातुम्) शकेमहि** - त्या नचिकेत अग्नीला आम्ही जाणू (प्रभुत्व मिळवू) इच्छितो.

### भावार्थ

जो (नचिकेत यज्ञ) यज्ञयाग करणाऱ्यांना सेतूप्रमाणे असतो; तसेच जो भयशून्य आहे आणि संसारसागर पार करण्याची इच्छा करणाऱ्यांना परम-ब्रह्म आश्रयस्थान आहे; त्या नचिकेत अग्नीला जाणण्यास आम्ही समर्थ होवो.

या देहात आत्मतत्त्व आणि अहंभाव हे दोन्हीही परमात्मा आणि जीवात्मा या स्वरूपात दिसतात. पहिल्या मंत्रात सर्व साक्षात्कारी ज्ञानी पुरुषांनी मांडलेला आणि पंडितांनी स्वीकारलेला असा एक सिद्धांत मांडलेला आहे. पंचमहाभूतांनी बनलेल्या या देहाचे नियंत्रण आणि संचालन या परमात्मा आणि जीवात्मा या दोन्ही घटकांकडून होते असे वाटत असले तरी त्यांच्यापैकी एक हे दुसऱ्याचे प्रतिबिंब आहे. एक बिंब तर दुसरे प्रतिबिंब. एक गोष्ट येथे ध्यानात घेतली पाहिजे की, प्रतिबिंबाला किंवा प्रतिमेला स्वतःचे असे अस्तित्व नसते. ते फक्त प्रकाशाच्या किंवा प्रकाशित वस्तूच्या संदर्भात असते. या छायेलाच जीव आणि ज्या प्रकाशामुळे ती छाया निर्माण होते त्यास जीवात्मा आणि आपल्यातील ईश्वरी अंश जो आहे त्यास परमात्मा असे म्हणतात. कर्मफले जी उपभोगली जातात ती जीवात्म्याकडून, पण परमात्मा आणि जीवात्मा हे दोघेही सहभागीदार असतात, असे श्रुतीवचन निर्देशित करते. या वचनाचा अक्षरशः अर्थ ध्यानात न घेता परमात्मा केवळ सर्व कर्मांचा आणि उपभोगांचा तो केवळ प्रकाशक आहे हा भावार्थ स्वीकारला पाहिजे, कारण आत्मा हा अकर्ता असल्यामुळे तो भोक्ता होत नाही, पण या मंत्रात द्विवचनाचा वापर करून उपनिषद म्हणते, 'ते दोघेही आपल्या सत्कर्मांची फळे भोगतात.' हा विरोधाभास श्री शंकराचार्यांनी आपल्या भाष्यात सोडविला आहे. ते म्हणतात की, या अहंकाराला त्या प्रकाशतत्त्वाखेरीज अस्तित्व असूच शकत नाही म्हणून ते दोघे सामान्यतत्त्वाने एकत्र जोडले जातात. तशाच अर्थाने 'जीवात्मा' आणि परमात्मा' हे दोघेही हृदयाच्या गुहेत वास करतात असे या ठिकाणी म्हटले आहे. या देहातील प्रज्ञास्वरूप गुहेमध्ये आपापले भोग भोगण्यासाठी राहतात. जीवालाच प्रारब्धरूपाने भोग भोगावे लागतात. ईश्वरमात्र अभोक्ता असून तो फक्त द्रष्टारूपानेच देहात राहतो. शिव आणि जीव यामध्ये परमात्माच देहाच्या सर्व स्थितींचे

संचालन या द्रष्टारूपाने राहून करत असतो. ब्रह्मज्ञानी आणि त्रिनचिकेत व पंचाग्नीचे साधन करणारे कर्ममार्गीही असाच अभिप्राय सांगतात. मुंडक उपनिषदात या जीव आणि शिवाचे म्हणजे बिंब व प्रतिबिंबाचे स्पष्टीकरण झाडावरील दोन पक्ष्यांचा दृष्टांत देऊन ऋषींनी समजावले आहे.

दुसऱ्या मंत्रामध्ये अक्षरब्रह्म जाणण्यासाठी आवाहन केले आहे. पवित्र यज्ञ जर निष्ठेने, श्रद्धेने आणि उत्कट भक्तिभावाने केला तर तो जीवात्म्याला ऊर्ध्व गतीने नेऊ शकतो व अमृततत्त्वाचा लाभ देऊ शकतो. जेथे द्वैताचे भय असून जन्ममरणातून सुटका मिळते. असे स्वर्गस्वरूप मिळविण्यासाठी साधक परब्रह्माची उपासना करतात तर काहीजण आध्यात्मिक, आधिभौतिक अशा त्रिविध तापांचा नाश करून सुखप्राप्तीसाठी अपरब्रह्माची उपासना करतात. अशा प्रकारे पर आणि अपर असे दोन प्रकारचे ब्रह्म असल्याचे वर्णन येथे आले आहे. पर असो वा अपर असो, ते ब्रह्म सहजतेने व शिघ्र मिळविण्यात आम्ही समर्थ व्हावे. नचिकेताग्नी व ज्ञानाग्नी हे जणू दोन पूल आहेत. ते दोन्ही बांधावयास आम्हाला स्वातंत्र्य प्राप्त होवो.

## ।। मंत्र ३ ।।

## शरीरादी संबंधी रथाचे रूपक

**आत्मानं रथिनं विद्धि शरीरं रथमेव तु ।**
**बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ।।३।।**

### अन्वयार्थ

**आत्मानम् रथिनम् विद्धि** - 'आत्म्याला' रथाचा स्वामी समज; **शरीरम् रथम् एव तु** - आणि देहास रथ समज; **बुद्धिम् तु सारथिम् विद्धि** - आणि बुद्धीला (रथाचा) सारथी समज; **मनः च प्रग्रहम् एव विद्धि** - आणि मनाला (जणू) लगाम समज.

### भावार्थ

आत्मा (जीवात्मा) हा रथी, भ्रमण बुद्धी हाच सारथी व मन हाच लगाम अशी कल्पना करू.



## ।। मंत्र ४ ।।

**इन्द्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ।**
**आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ।।४।।**

### अन्वयार्थ

विवेकी पुरुष; **इंद्रियाणि हयान् आहुः** - इंद्रियांना (आणि सहजप्रवृत्तींना) अश्व म्हणतात; **तेषु (इंद्रियेषु) गोचरान् विषयान्** - त्यांच्या मार्गांना विषयवस्तू (समज). **आत्मा - इंद्रिय-मन-युक्तम्** - शरीर मन यांनी युक्त अशा जीवाला **भोक्ता इति आहुः** - भोक्ता असे (बुद्धिमान) म्हणतात.

### भावार्थ

इंद्रियांना (आणि सहजप्रवृत्तींना) ते घोडे म्हणतात. त्यांच्या मार्गांना विषयवस्तू (समजतात). शरीर-इंद्रिय-मन यांनी युक्त अशा त्या आत्म्याला बुद्धिमान भोक्ता म्हणतात.

तिसऱ्या व चौथ्या मंत्रामध्ये शरीराला रथाची उपमा दिली आहे. हे रथाचे रूपक अनेक ग्रंथकर्ते, पंडित, प्रवचनकार आत्मा आणि जीवात्मा याचे स्वरूप सांगण्यासाठी आपल्या वक्तव्यातून विशद करत असतात. देहाचे सर्व व्यवहार सांगण्यासाठी योजलेले हे अत्यंत सुंदर रूपक आहे. या रूपकाचा उल्लेख अनेकजण अनेक तऱ्हेने करीत असतात. या रूपकाचाच संदर्भ भगवद्गीतेतसुद्धा रेखाटला आहे. या रूपकामध्ये आत्मा हा या रथाचा मालक आहे. शुद्ध आत्मानात्मविवेक, बुद्धी हा या रथाचा सारथी आहे. मानवाचा देह हा रथ असून देहाच्या हालचाली ज्या लगामाच्या साहाय्याने मार्गस्थ होतात ते लगाम म्हणजे मन आहे. घोडे ज्याप्रमाणे रथ वाहून नेतात त्याप्रमाणे ही दहा इंद्रिये हे त्या रथाचे घोडे आहेत. शब्द-स्पर्शादि पाच विषय हाच ह्या देहरूप रथाचा रस्ता आहे. आत्मा, इंद्रिये व मन यांचा समुच्चय म्हणजे जीवात्मा. यास ज्ञाते लोक भोक्ता असे म्हणतात. रथीप्रमाणे असलेला जीव सर्वांना आत्माच वाटतो. वास्तविक आत्मा हा केवळ साक्षी असून तो अकर्ता व अभोक्ता असतो. हे रथाचे रूपक आत्म्याचे स्वरूप नीट समजावण्यासाठी उपनिषदकारांनी मांडले आहे. या रथाचा मालक जो आत्मा आहे त्याच्याच अस्तित्वामुळे या रथाची हालचाल होते. असा हा आत्मा अनादि अनंत आहे व जीवतर जन्ममरण, व्याधी अशा अवस्थांनी व्यग्र झालेला आहे. हा रथ हाकणाऱ्या दहा घोड्यांचे

जे वर्णन आहे ती इंद्रिये म्हणजे पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये होत. असे हे इंद्रियरूपी घोडे विषयवस्तूरूपी रस्त्यावरून धावत असतात. श्रेय मार्गाने जाणारा रथ हा जीवनाचा विकास करून कृतार्थ होत असतो व प्रेय मार्गाचा अवलंब करून हा रथ आडमार्गाला किंवा खाचखळग्यात पडून जीवनाचा नाश करून घेत असतो. म्हणून बुद्धी हा या रथाचा सारथी असतो आणि मन हे या सारथ्याच्या हातातील लगाम असते. आत्म्याचा प्रवास हा शेवटी कुठे संपणार असतो, ते या इंद्रियरूपी घोड्यांचे या विषयरूपी रस्त्यावर हा बुद्धीरूपी सारथी या मनरूपी लगामाने कसे नियंत्रण करतो यावर सर्व अवलंबून असते. म्हणून श्रेय बुद्धी असेल तर ही इंद्रिये ताब्यात असतात त्यामुळे या रथाचा प्रवास शब्द-स्पर्शादि लोभांच्या प्रलोभनांनी खडतर मार्गावरूनसुद्धा सांभाळला जातो. दुःखाच्या मार्गावरून जाऊन शेवटी प्रसन्नतेच्या मार्गावर जाण्यासाठी या घोड्यांना नियंत्रित करावे लागते. म्हणून बुद्धीरूपी सारथी हा श्रेष्ठ असावा लागतो. अशा बुद्धीहून आत्मा श्रेष्ठ आणि महान आहे. इंद्रिये, विषय, मन, बुद्धी, आत्मा अशा या पायऱ्या आहेत. इंद्रिये ही तळाची पायरी आहे जो इंद्रियांच्या भोगातच मश्गुल असतो तो वरच्या पायरीवर जाण्यास असमर्थ ठरतो. शुद्धबुद्धी जेव्हा असते तेव्हा आत्म्यातच ईश्वराचे रूप प्रगटते. या मंत्रात पंडित म्हणजे ज्यांनी आपल्या जीवनात आत्मतत्त्वाची अनुभूती घेतली आहे असे द्रष्टे पुरुष होत. या रथाच्या रूपकातून प्रपंच भोगणाऱ्या जीवाची व सत्यतत्त्व असणाऱ्या परमशुद्ध शिवाचे स्वरूप प्रगट झाले आहे. एक अकर्ता व अभोक्ता असे परमतत्त्व आणि दुसरा या सत्यतत्त्वाच्या चिदाभासातील केवळ प्रतिबिंब असणारा भ्रांतीजन्य जीवात्मा होय.

## ।। मंत्र ५ ।।

**यस्त्वविज्ञानवान्भवत्ययुक्तेन मनसा सदा ।**
**तस्येन्द्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ।।५।।**

### अन्वयार्थ

जो नेहमी आवरता येणार नाही असा मनामुळे यथार्थ विचार करावयास असमर्थ होतो; **तस्य इंद्रियाणि** - अशाची इंद्रिये, **सारथेः दुष्टाः अश्वाः इव** - सारथ्याच्या दुष्ट घोड्याप्रमाणे; **अवश्यनि भवन्तिः** - अनावर बनतात.



### भावार्थ

परंतु जो (बुद्धी) सारथी सतत अविवेकी व असमाहित चित्ताचा असतो त्याच्या स्वाधीन इंद्रिये कधीही राहत नाहीत. ज्याप्रमाणे सारथ्याच्या हातात दुष्ट घोडे (स्वाधीन राहत नाहीत.)

## ।। मंत्र ६ ।।

**यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा सदा ।**
**तस्येन्द्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ।।६।।**

### अन्वयार्थ

**यः तु सदा युक्तेन मनसा विज्ञानवान् भवति** - परंतु जो नेहमी सुनियंत्रित मनामुळे यथार्थ विचार करावयास समर्थ असतो. त्याची इंद्रिये; **सारतेःच सदश्वाः इव** - सारथ्याच्या (संयमित) चांगल्या घोड्याप्रमाणे; **वश्यनि भवन्तिः** - ताब्यात राहतात.

### भावार्थ

परंतु जो (बुद्धीरूपी सारथी) कुशल व समाहित चित्ताचा असतो, त्याच्या स्वाधीन इंद्रिये राहतात, ज्याप्रमाणे चांगल्या सारथ्याच्या हातात उत्तम घोडे राहतात.

## ।। मंत्र ७ ।।

**यस्त्वविज्ञानवान्भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ।**
**न स तत्पदमाप्नोति संसारम् चाधिगछति ।।७।।**

### अन्वयार्थ

आणि जो यथार्थ आकलनशक्ती नसलेला, विवेकहीन आणि नेहमी अशुद्ध चित्ताचा असतो; **सः तत् पदम् म आप्नोति** - तो त्या पदाला कधीच पोहोचत नाही; **संसारम् च अधिगच्छति** - आणि जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडतो.

### भावार्थ

जो यथार्थ आकलनशक्ती नसलेला, विवेकहीन आणि नेहमी अशुद्ध चित्ताचा असतो. तो त्या पदाला कधीच पोहोचत नाही; उलट जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडतो.

## ।। मंत्र ८ ।।

**यस्तु विज्ञानवान्भवति समनस्कः सदा शुचिः ।**
**स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ।।८।।**

### अन्वयार्थ

**यः तु विज्ञानवान् समनस्कः सदाशुचिः भवति** - जो बुद्धिमान आणि नेहमी शुद्ध अंतःकरणाचा आणि संयमित मनाचा असतो; **सः तप तत् पदम् आप्नोति** - तो त्या पदाप्रत की जेथून त्याला पुन्हा जन्म येत नसतो.

### भावार्थ

परंतु जो विज्ञानवान समाहित चित्ताचा आणि सदा पवित्र असतो तो असे (नित्य) पद मिळवितो की जेथून त्याला मागे परत यावे लागत नाही.

## ।। मंत्र ९ ।।

**विज्ञानसारथिर्यस्तु मनः प्रग्रहवान्नरः ।**
**सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परम् पदम् ।।९।।**

### अन्वयार्थ

**विज्ञान सारथिः यः तु** - ज्याचा सारथी म्हणून प्रज्ञा असते; **मनः प्रग्रहवान्** - (व) मन हे संयमित लगाम म्हणून असते; **सः (नरः)** - तो संसारयात्रेचा शेवट करतो, **ततु विष्णोः परमम् पदम् आप्नोति** - म्हणजेच विष्णूचे ते परमस्थान गाठतो.

### भावार्थ

जो मनुष्य विवेकयुक्त बुद्धीसारथीने युक्त होऊन आणि मनाच्या लगामाने संयमित होतो तो संसारयात्रेचा शेवट गाठतो, तो तर परमात्म पदाला पोहोचतो.



तीन व चार या मंत्रांमध्ये रथाच्या रूपकाचे वर्णन केल्यानंतर ते रूपक स्पष्टपणे समजावून सांगण्यासाठी पाच ते नऊ या मंत्रांची योजना झाली आहे. पाचव्या मंत्रामध्ये मनाचे म्हणजे या लगामाचे वर्णन केले आहे. हा लगाम ज्या सारथीच्या हातात असतो तो सारथी जर श्रेय व प्रेय याचा विवेक करीत नसेल तर त्याचा लगाम हा सैल सुटतो. आणि आधीच चंचल असणारे मन हा लगाम सैल झाल्यामुळे अधिकच सैरावैरा व विक्षिप्त धावायला लागते आणि असे मुळातच मर्कट स्वभावासारखे असलेले मन सैल झाल्यामुळे इंद्रियेसुद्धा बेफाम, बेलगाम, अनियंत्रित होतात व सैरभैर उधळू लागतात. कारण इंद्रिये मनाच्या स्वाधीन असून मन बुद्धीच्या स्वाधीन आहे. म्हणून जर बुद्धी पराधीन झाली तर मन व इंद्रिये सर्वच भोगविषयाकडे प्रवृत्त व्हायला लागतात. विषयात संचरणाऱ्या इंद्रियांच्या मागोमाग मन जाऊ लागले म्हणजे पाण्यातील नौकेत जर वारा घुसला तर नौका जशी डळमळायला लागते तसे पुरुषाची बुद्धी विचलित व्हायला लागते.

म्हणून सहाव्या मंत्रात इंद्रिये जिंकणारा विवेकी पुरुष आत्मलाभ करून घेण्यास पात्र होतो असे म्हटले आहे. ज्याची बुद्धी स्थिर, शुद्ध व निष्काम झालेली असते तो श्रेयाचे स्वरूप जाणून प्रेयाला अव्हेरतो. सुनियंत्रित मनाने आपल्या आवेगांना आवर घालून त्यास देवत्वाकडे नेणाऱ्या मार्गावर सुस्थिर करतो. असा युक्त झालेला जो साधक आहे त्याला येथे विद्वानवान असे म्हटले आहे.

सातव्या मंत्रात अगदी याच्या उलट जो विवेकहीन आहे अशा मनुष्याचे वर्णन आहे. असा मनुष्य प्रेय मार्गानी गेल्यामुळे पथभ्रष्ट व ध्येयहीन होतो. त्यामुळे त्याला आत्मदर्शनाचा मार्ग प्राप्त होत नाही. विषयलालसा, विकाराचे थैमान व भोगविषयीचे आकर्षण असल्यामुळे त्याचा देहरूपी रथ आत्मदर्शनाच्या राजमार्गावरून न जाता मध्येच आत्मनाश करून घेतो आणि ज्या सारथीच्या हातात आत्मकल्याणाचा लगाम नसतो तो पुन्हा एक जन्म-मरणाच्या चक्रात सापडतो.

आठव्या व नवव्या मंत्रात हे ब्रह्मपद ज्याला प्राप्त होते त्याचे वर्णन आहे. जो विवेकी, निग्रही, पवित्र आहे तो या रथाला श्रेय मार्गाने नेतो. या संसारसागरातून तो पार होऊन विष्णूपदाला प्राप्त करून घेतो. श्रेय व प्रेय, नित्य व अनित्य, सत्य व असत्य यातील श्रेयस्कर मार्ग निवडून आपली इंद्रिये स्वाधीन ठेवतो. त्यामुळे आंतरिक शुद्धी होऊन ईश्वरतत्त्वाचा अनुभव घेतो. 'ईशावास्यम् ईदम् सर्वम्' म्हणजे ईश्वर सर्वत्र भरून राहिला आहे अशी दृष्टी त्याला प्राप्त होते. आत्मौपम्य दृष्टीने तो जगाकडे पाहतो, अशा मनुष्याला मृत्यूनंतर पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही.

## || मंत्र १० व ११ ||
## परमपुरुष हेच श्रेष्ठतत्त्व

**इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्वरः ।।१०।।**

### अन्वयार्थ

विषयवस्तू इंद्रियांच्याही पलीकडच्या असतात; **मनः अर्थेभ्यः परं** – मन विषयवस्तूंच्याही पलीकडचे असते; **मनसः तु पराबुद्धीः** – मनाच्याही पलीकडची बुद्धी असते; आणि महान आत्मा बुद्धीच्याही पलीकडचा आहे.

### भावार्थ

इंद्रियाहून त्यांचे विषय, विषयाहून मन, मनाहून बुद्धी व बुद्धीहून (हिरण्यगर्भ) आत्मा सर्वश्रेष्ठ आहे.

**महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरूषः परः ।**
**पुरूषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ।।११।।**

### अन्वयार्थ

**महतः परम् अव्यक्तम्** – 'महत्' तत्त्वाच्या पलीकडे अव्यक्त असते. – 'अव्यक्ता'च्या पलीकडे काहीच श्रेष्ठ नाही. **सा काष्ठा** – तीच (सूक्ष्मत्वाची) पराकाष्ठा; **सा परा गतिः** – तीच परमश्रेष्ठ सिद्धी.

### भावार्थ

महत् तत्त्वापेक्षा – अव्यक्त (मूळप्रकृती) श्रेष्ठ, अव्यक्तापेक्षाही पुरुष श्रेष्ठ; पुरुषाच्या पलीकडे काहीच (श्रेष्ठ) नाही. तीच सूक्ष्मत्त्वाची पराकाष्ठा, तीच श्रेष्ठ गती होय.

भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायात वरील मंत्राला साम्य असणारा ४२ वा श्लोक आहे. तो असा –

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ।।४२।।**

**अर्थ** – असे म्हणतात की, (स्थूल बाह्य पदार्थांच्या मानाने ते पदार्थ



जाणणारी) इंद्रिये पर म्हणजे पलीकडची, इंदियांच्या पलीकडचे मन, मनाच्याही पलीकडे (व्यवसायात्मक) बुद्धी, आणि जो बुद्धीच्याही पलीकडे (तो) तो (आत्मा) आहे.

दहाव्या मंत्राचा प्रतिध्वनी वरील श्लोकात प्रगट झाला आहे. विषयवस्तू ही ज्ञानेंद्रियांची कारणे होत. कारण हे कार्यापेक्षा सूक्ष्मतर असते. रूप, रस, शब्द, गंध आणि स्पर्श या विषयवस्तूंचे परिसर ज्ञानेंद्रियांच्याही पलीकडचे असतात. वस्तूंच्या पलीकडचे मन असते. मन हे ज्ञानेंद्रियांच्या कारणापेक्षा अधिक सूक्ष्म असते. अशा चंचल मनाला सैरभैर धावू देणे किंवा त्याला स्थिर ठेवणे हे बुद्धीच्या स्वाधीन आहे. बुद्धीची निर्णायक शक्ती जशी असेल त्याप्रमाणे मन कार्यप्रवृत्त होते. अशा बुद्धीच्या पलीकडे श्रेष्ठ आत्मा असतो. या बुद्धी आदी सर्वांना मायेचे अधिष्ठान असून तिलाच हिरण्यगर्भ किंवा समष्टीबुद्धी असेही म्हणतात. येथे आत्मा या शब्दाने हिरण्यगर्भच अभिप्रेत आहे. हिरण्यगर्भाहून अव्यक्त हे श्रेष्ठ सूक्ष्मतत्त्व असून पुरुषाच्या ठिकाणी भासणारी आद्य मूल प्रकृती तेच तत्त्व होय. अव्यक्त प्रकृती ही पुरुषानेच सामग्री आणि कृतीच्या रितीवाचून स्वतःचे स्वरूपावर धारण केली आहे. 'अव्यक्त', 'प्रधान', 'मूळप्रकृती' आणि 'माया' या समानार्थी संज्ञा आहेत. अव्यक्ताच्याही पलीकडे पुरुष असतो आणि ज्याला अव्यक्त स्थिती म्हणतात त्याहूनही सूक्ष्मतर असते. त्याला परमतत्त्व, 'शुद्धसतत्त्व' असे म्हणतात. या मंत्रात त्याला 'पुरुष' असे म्हटले आहे. या पुरुषाच्या पलीकडे काहीच नाही या परात्पर पुरुषाशी तादात्म्य पावून मनुष्य परमशांती आणि परिपूर्ण स्थितीला पोहोचू शकतो. मनुष्याच्या जीवनाची कृतार्थतासुद्धा हे मिळविण्यातच आहे.

**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम् ।।८.२१।।**

ज्या परमपुरुषाला प्राप्त केल्यामुळे जन्म-मरण प्राप्त होत नाही व जेथे गेल्यानंतर पुन्हा परत फिरणे नाही, अशी ही श्रेष्ठ गती आहे. वरील दोन मंत्रात या परमपुरुषाला प्राप्त करण्याचे सोपान विशद करून सांगितले आहे. विषय, ज्ञानेंद्रिये त्यापेक्षा सूक्ष्मतर मन व मनाच्यापलीकडे बुद्धी, बुद्धीपेक्षाही सूक्ष्म समष्टीबुद्धी, सर्वाधिक सूक्ष्म असते ते अव्यक्त आणि अव्यक्ताहून सूक्ष्मतर असणारे ते परमतत्त्व किंवा पुरुष अशी ही साखळी या दोन मंत्रात स्पष्ट केली आहे.

## ।। मंत्र १२ ।।
## आत्मा सूक्ष्म बुद्धिग्राह्य आहे

**एष सर्वेषु भूतेषु**
**गुढोऽऽत्मा न प्रकाशते ।**
**दृश्यते त्वग्र्यया बुद्धया**
**सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ।।१२।।**

### अन्वयार्थ

**सर्वेषु भूतेषु गुढः एष आत्मा न प्रकाशते** - संपूर्ण भूतमात्रामध्ये लपलेला हा आत्मा प्रकाशत नाही, परंतु अतिसूक्ष्म द्रष्ट्याकडून (आपल्या) तीव्र आणि सूक्ष्म बुद्धीने पाहिला जातो.

### भावार्थ

हा सर्व सृष्ट पदार्थांच्या अंतर्यामी असलेला आत्मा (सर्वांना) उघड दिसत नाही तर सूक्ष्मदर्शी पुरुषांना आपल्या तीव्र व सूक्ष्म बुद्धीने तो दिसतो.

वरील मंत्रात सर्व प्राणिमात्रात दडून असलेल्या गूढ आत्मतत्त्वासंबंधीची कल्पना स्पष्ट केली आहे. आंतर्यामीच्या आत्म्याचे समष्टी आत्मतत्त्वाशी असलेल्या ऐक्याचे ज्ञान ही सूक्ष्मबुद्धीने जाणावयाची ज्ञानमार्गाची प्रक्रिया आहे. संपूर्ण जीवसृष्टीत हे आत्मतत्त्व भरून राहिले आहे. भोगविषयात रममाण असणाऱ्या विकारी मनुष्याला याचे दर्शन होत नाही. अविद्या आणि अज्ञान या आवरणाखाली ही माणसे वावरत असतात. आत्मा हा मायेच्या आवरणाखाली झाकलेला असल्यामुळे मनुष्य त्याला न जाणता मायेच्याच मागे धाव असतो. देहात्मक बुद्धी असल्यामुळे तो आपल्या शरीर इंद्रियांनाच सर्वस्व मानत असतो. संत-महात्मे व सद्गुरू अशा मायेत गुरफटलेल्या लोकांना 'तू शरीर नसून अमर, अनादि व सच्चिदानंद आत्म्याचा अंश आहेस व तुझे मूळस्वरूपही तसेच आहे,' असा उपदेश करतात. माया नेहमीच जीवाला जन्म-मरणाच्या चक्रात अडकवून ठेवते. ज्यांची बुद्धी मोहात अडकलेली आहे अशांपासून ती त्या परमपुरुषाला दूर ठेवते. एखादाच हे रहस्य जाणणारा पुरुष स्थूलाच्या पलीकडे जातो व आपल्या खडतर साधनेच्या बळावर मायेच्या अधिष्ठानाला जाणतो. अष्टतत्त्व प्रधान अशी जी प्रकृती आहे त्याच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न करतो. अंतःकरणशुद्धी होऊन अंगी वैराग्य बाणल्यामुळे



असा पुरुष आत्मस्वरूपाकडे जाऊ शकतो व हे आत्मज्ञान जाणून सर्व जीवसृष्टीत गूढ होऊन राहिलेल्या परमतत्त्वाची अनुभूती घेतो.

## ।। मंत्र १३ ।।
## बुद्धीला सूक्ष्मता आणण्याचे उपाय

**यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञत्तद्यच्छेज्ज्ञान आत्मनि ।**
**ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छान्त आत्मनि ।।१३।।**

### अन्वयार्थ

विवेकपुरुषाने वाक् (आदि यांचा) मनात लय करावा; मनाचा आपल्या प्रकाशरूप बुद्धीत लय करावा; **ज्ञान आत्मनि महति नियच्छेत्** - बुद्धी खुद्द महत् तत्त्वातच विलीन करावी; **तत् शान्ते आत्मनि यच्छेत्** - आणि महत् तत्त्वास खुद्द परमशांत आत्म्यातच नियुक्त करावे.

### भावार्थ

विद्वान पुरुषाने वाक् (आदी इंद्रिये) यांचा मनामध्ये, मनाचा खुद्द प्रकाशरूप बुद्धीमध्ये, बुद्धीचा 'महत् तत्त्वा'मध्ये आणि 'महत्' तत्त्वाचा शांत आत्म्यात लय करावा.

## ।। मंत्र १४ ।।

**उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।**
**क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गंपथस्तत्कवयो वदन्ति ।।१४।।**

### अन्वयार्थ

**उत्तिष्ठत** - (हे अवद्याग्रस्ता) ऊठ; **जाग्रत** - जागा हो; **वरान् प्राप्य** - महान गुरूकडे जाऊन; **निबोधत** - आत्मतत्त्व समजावून घे; **क्षुरस्यनिशिता धारा (इव)** - पात्याच्या तीक्ष्ण धारेप्रमाणे; **तत् दुरत्यया दुर्गम् पथः** - तो ओलांडण्यास कठीण आणि चढण्यास अवघड मार्ग आहे; **(इति) कवयः वदन्ति** - असे ज्ञानी लोक म्हणतात.

## भावार्थ

अहो (अनादि अविद्याग्रस्त) लोकहो! उठा!! जागे व्हा!! आणि श्रेष्ठ पुरुषाजवळ जाऊन ज्ञान प्राप्त करा. ज्याप्रमाणे सुरीची धार तीक्ष्ण व तीवरून चालण्यास अत्यंत कठीण असते, त्याचप्रमाणे तत्त्वज्ञानी आत्मज्ञानाचा मार्ग अति कठीण असल्याचे सांगतात.

## || मंत्र १५ ||

**अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगंधवच्च यत् ।**
**अनाद्यनंतं महतः परं ध्रूवं निचाय्य तं मृत्यूमुखात्प्रमुच्यते ।।१५।।**

## अन्वयार्थ

(जो) त्याला अशब्द, अस्पर्श, अरूप - तसेच रसहीन, नित्य, गंधहीन. **अनादि नन्तम महतः परम् ध्रुवम् निचाय्य** - आणि अनादि अनन्त महत् तत्त्वाच्याही पलीकडचा समजून घेतो, त्यानंतर **तत् मृत्यूमुखात प्रमुच्यते** - तो मृत्युमुखातून मुक्त होतो.

## भावार्थ

जो अशब्द, अस्पर्श, अरूप - तसेच रसहीन, नित्य, गंधरहित (जो) अनादि, अनन्त महत् तत्त्वाच्याही पलीकडचा व निश्चल असतो त्या आत्मतत्त्वाला जाणून पुरुष मृत्युमुखातून मुक्त होतो.

१३ व्या मंत्रात अशा विवेकी पुरुषाचे वर्णन आले आहे. अशा पुरुषाने आत्मज्ञान प्राप्त करण्याची साधना कशी करावी त्याचे स्वरूप येथे वर्णन केले आहे. वाक् म्हणजे वाणी असा सर्व इंद्रियांसाठी एकच शब्द सूचकतेने योजला आहे. सर्व कर्मेंद्रिये आणि ज्ञानेंद्रिये मनाच्या संपूर्ण निग्रहाखाली आणावी. त्यानंतर इंद्रियांसह मनाला मनाच्याच साहाय्याने बुद्धीमध्ये लय करावे. मन जेव्हा अविकारी, शुद्ध व शांत होते त्या वेळी ते बुद्धीमध्ये एकभावाने तादात्म्य पावते. त्यानंतर असा बुद्धिरूप निष्पाप आत्मा ध्यानाच्या वेळी अव्यक्तात लय करावा. अशा प्रकारे स्थूलापासून सूक्ष्माचे वर्म जाणून घेऊन परब्रह्मस्वरूप अशा सर्वश्रेष्ठ स्वरूपावर प्रतिष्ठित व्हावे. अशा स्वरूपाचे जेव्हा ज्ञान होते त्या वेळी त्या जीवाला परमशांतीचा लाभ होतो. अशा पुरुषाचे जीवन कृतार्थ होऊन त्याला अक्षय सुखाची प्राप्ती होते.

म्हणून १४ व्या मंत्रात उपनिषदकर्त्या ऋषींनी दिव्य संदेश दिला आहे.



या ऋषींनी या परमतत्त्वाची प्रचिती स्वतः घेतली व त्या अखंड सुखाचा स्वतः लाभ घेतल्यानंतर तसाच आनंद सर्वांनी घ्यावा अशा उदात्त भावनेने त्यांनी पुढील पिढीला हा दिव्य संदेश या मंत्रात दिला आहे. 'उत्तिष्ठत् जाग्रत्' - उठा आणि जागे व्हा, या दिव्य संदेशाला स्वामी विवेकानंदांनी आपल्या मिशन कार्याचे बोधचिन्ह केले होते. ऋषी सांगतात, 'अविद्या व अज्ञान यांनी घेरलेल्या, तमोरूपी अंधकारात वावरणाऱ्या स्थूलबुद्धीच्या लोकांनो - उठा! ही तमो निद्रा टाकून जागे व्हा. देहजन्य मोहरूपी भवसागरात बुडणाऱ्यांनो कोणातरी महान गुरूंच्या सान्निध्यात जाऊन तुम्ही स्वतःची ओळख करून घ्या. आपले स्वरूप नेमके काय आहे याचा बोध करून घ्या. आपल्या अलौकिक, आंतरिक दिव्यशक्तीची जाणीव अशा गुरूंच्या सत्संगतीत राहून करून घ्या. धारधार सुरीवरून अनवाणी चालणे जेवढे कठीण असते तेवढे हे आत्मज्ञानसुद्धा अवघड असते. जे या वाटेने आधीच पोहोचले आहेत अशा ब्रह्मनिष्ठ, श्रोत्रिय, दयाळू अशा सच्चा गुरूंना शरण जाऊन ही ब्रह्मविद्या आत्मसात करा. सद्गुरूंच्या साहाय्याशिवाय या कठीण मार्गाचे नीट आकलन होणार नाही. परिपूर्ण आत्मसंयमन व मनोनिग्रहता झाल्याशिवाय आत्मप्राप्तीचा मार्ग सुकर होत नाही, असा सर्व ज्ञानी पुरुषांचा निर्वाळा आहे.

जेव्हा हे आत्मज्ञान होते त्या वेळी तो पुरुष जन्म-मरणाच्या रहाटगाडग्यातून सुटतो. प्रकृतिमात्राचे येथे वर्णन केले आहे. हे जग ज्या शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यासारख्या प्रवृत्तीच्या गुणधर्मांनी बनले आहे. आपला देहसुद्धा याच गुणतत्त्वांनी बनला आहे. या सर्व मर्त्य व अनित्य तत्त्वांचा हळूहळू क्षय होत जातो. जे जे शरीर रूपाने किंवा उपाधिरूपाने आहे त्याचा नाश अटळ आहे, पण ज्याला उपाधी नाही असे जे आत्मतत्त्व आहे ते मात्र सर्वत्र असल्याने त्याचा नाश होत नाही म्हणून ते नित्य आहे. हा आत्मा अजन्म, अनादि, अनंत असल्यामुळे तो कोठून आला व कोठे जाणार या संबंधी कसलेच ज्ञान होत नाही. अशा आत्म्याचे ज्ञान झाले असता मनुष्य कृतकृत्य होतो व जन्म-मृत्यूचा फेरा चुकवतो.

## || मंत्र १६ ||

## यमनचिकेता संवाद माहात्म्य

**नाचिकेतमृपाख्यानं मृत्यूपोक्तं सनातनम् ।**
**उक्त्वा श्रुत्वा च मेधावी ब्रह्मलोके महीयते ।।१६।।**

## अन्वयार्थ

नचिकेतद्वारा प्राप्त झालेले आणि यमदेवानी सांगितलेले हे सनातन विज्ञान; **उक्त् वा श्रुत्वाच** - सांगितल्याने आणि ऐकल्याने; **मेधावी ब्रह्मलोके महियते** - विद्वानसाधक ब्रह्मलोकात गौरविला जातो.

## भावार्थ

यमदेवानी सांगितलेले हे नचिकेताचे कथानक ऐकल्यावर आणि ते पुन्हा सांगितल्यावर बुद्धिमान साधक ब्रह्मलोकात गौरविला जातो.

या उपनिषदाचे माहात्म्य या वरील मंत्रात वर्णन केले आहे. हा संवाद गुरुमुखातून श्रद्धेने ऐकला असता विवेकी मनुष्य आत्मज्ञान प्राप्त करण्यास पात्र होतो. सनातन अशा वेद पुरुषाचे हे पवित्र ज्ञान झाल्यानंतर त्या ज्ञात्याचे माहात्म्य ब्रह्माएवढे होते. ब्रह्मीभूत होऊन समदृष्टीने तो जगाकडे पाहतो व जगही या वंदनीय पुरुषासमोर नतमस्तक होते.

## ।। मंत्र १७ ।।

**य इमं गुह्यं श्रावयेत् ब्रह्मसंसदि ।**
**प्रयतः श्राद्धकाले वा तदानन्त्याय कल्पते इति ।।१७।।**

## अन्वयार्थ

**यः इमम् परमम् गुह्मम्** - जो (पुरुष) या परम गुह्य ग्रंथाचे; ब्रह्म समुदायात किंवा पितरांच्या श्राद्धकाली भक्तिपूर्वक प्रवचन करतो; **(सः) तदा अन्नन्त्याय कल्पते** - तो अमृततत्त्व प्राप्त करतो. - तेव्हा तो अमृततत्त्व प्राप्त करून घेतो.

## भावार्थ

जो पुरुष ह्या अतिशय गूढ अशा ग्रंथाचे पवित्रपणाने अधिकाऱ्यांच्या सभेत किंवा श्राद्धकाळी (भोजनास बसलेल्या ब्राह्मणांना) केवळ मंत्राचे किंवा त्यांचे सविवरण श्रवण करवितो तेव्हा त्या श्राद्धाला अनंत फळे मिळतात.

ह्या अत्यंत गूढ अशा संवादाचे जो श्रद्धायुक्त व पवित्र होऊन श्राद्धसमयीच्या भोजनाच्या वेळी ब्राह्मणांना निरूपण करतो तेव्हा त्याला अपार पुण्यप्राप्ती होते व त्याचे सर्व संसारक्लेश नाहीसे होतात. असा पुरुष हा ज्ञानप्राप्त झाल्यामुळे आत्मलाभ प्राप्त करून घेतो व सदोदित प्रसन्न राहतो.

या ठिकाणी ब्रह्मविद्येचा गौरव केला आहे. पहिल्या अध्यायाच्या शेवटच्या



वल्लीच्या शेवटी येथे फलश्रुती सांगितलेली आहे. वेदान्ताच्या अधिकारी अभ्यासकाचे संपूर्ण चित्र येथे रेखाटलेले आहे. नचिकेतासारखा महान शिष्य यमदेवासारख्या ब्रह्मतत्त्वास पोहोचलेल्या महान गुरूकडे येतो आणि संवादरूपाने आत्मतत्त्वाचे स्वरूप समजून घेतो. अशी फलश्रुती ही ग्रंथाच्या शेवटी सांगितलेली असते म्हणून काही टीकाकार या फलश्रुतीनंतर कठोपनिषदाचा शेवट झाला असे म्हणतात. पण हे त्यांचे म्हणणे यथार्थ वाटत नाही. कारण आत्मतत्त्वाचे स्वरूप, योगाचा अर्थ इत्यादी काही महत्त्वाच्या मुद्यांचा केवळ उल्लेख पहिल्या अध्यायात झाला आहे व त्याचे सविस्तर वर्णन दुसऱ्या अध्यायात आले आहे. ही दोन्हीही वर्णने एक दुसऱ्याला पूरक अशीच आहेत.

***प्रथम अध्यायातील तृतीय वल्ली येथे समाप्त होते.***

×××

# द्वितीय अध्याय - प्रथम वल्ली

## ।। मंत्र १ ।।
## इंद्रियांची बहिर्मुखता

**पराञ्चि खानि व्यतृणत स्वयम्भू**
**तस्मात् पराङं पश्यति नान्तरात्मन् ।**
**कश्चिद् धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्**
**आवृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ।।१।।**

### अन्वयार्थ

**स्वयंभूः पराश्चि खानि व्यतृणात्** - स्वयंभू (ब्रह्माने) बहिर्मुख इंद्रिये निर्माण केली; म्हणून (जीव) बाह्यजगतच (विषयांना) पाहतो; अंतरजगत (पाहत) नाही. **अमृततत्वं इच्छन् कश्चिंत् धीरः आवृत्तचक्षुः प्रत्यगात्मानम् ऐक्षत् (पश्चति)** - परंतु अमृतत्त्वाची इच्छा करणारे काही धैर्यवान पुरुष विषयवस्तूपासून आपली इंद्रिये परावृत्त करून प्रत्यगात्म्यास ओळखतात.

### भावार्थ

स्वयंभू ब्रह्माने बहिर्मुख इंद्रिये निर्माण केली. म्हणून मानव बाह्य जगतच पाहतो, अंतरजगत् (आत्मा) नव्हे. परंतु अमृतत्त्वाची इच्छा करणारे काही धैर्यवान पुरुष विषयवस्तूपासून आपली इंद्रिये परावृत्त करून अंतरात्म्यास ओळखतात.

## ।। मंत्र २ ।।

**पराचः कामाननुयन्ति बालास्ते**
**मृत्योर्यन्ति विततस्य पाशम् ।**
**अथ धीरा अमृतत्त्वं विदित्वा**
**ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयन्ते ।।२।।**



### अन्वयार्थ

**बालाः पराचः कामान् अनुयान्ति** - बालबुद्धीचे अज्ञानी (अविवेकी) बाह्य सुखाच्या मागे लागतात; ते **विततस्य मृत्योः पाशम् यान्ति** - ते (अल्पबुद्धी जीव) सर्वगामी मृत्यूच्या पाशात पडतात; **अथ धीराः इह अध्रु वेषु ध्रुवम् अमृतत्त्वम् विदित्वा न प्रार्थयन्ते** - परंतु विद्वान (विवेकी), सर्व अनित्यामध्ये अमृतत्त्व हे नित्य आहे हे ओळखून कशाचीही इच्छा करीत नाहीत.

### भावार्थ

अल्पज्ञ पुरुष बाह्यभोगांच्या मागे लागत असतात आणि म्हणून ते सर्वत्र पसरलेल्या मृत्यूच्या पाशात पडतात; परंतु विवेकी पुरुष अमृतत्त्वाला नित्यस्वरूपाचे समजून कसल्याही अनित्याची इच्छा करीत नाहीत.

ब्रह्मदेवाने मनुष्याला जी इंद्रिये दिलेली आहेत ती बहिर्मुख आहेत. त्यामुळे मनुष्याचा स्वाभाविक ओढा हा विषयांकडे असतो, त्यामुळे साहजिक प्रवृत्ती ही भोगविषयात रममाण होण्याची असते. मन मुळातच चंचल आहे व जेव्हा विवेक नसतो त्या वेळी चंचल मन व अस्थिर बुद्धी यामुळे तो आत्मनाशाकडे जाण्यास प्रवृत्त होतो. जे बहिर्मुखी झाले ते बुडाले व जे अंतर्मुखी झाले ते तरले, असे संत रामदास म्हणतात. सर्वच संतांनी अंतर्मुखतेवर भर दिला, कारण आत्मा हा हृदयरूपी गुहेत दडलेला असल्यामुळे त्याचे ज्ञान करून घेण्यासाठी त्याला आत डोकवावे लागते, म्हणून आत्मज्ञानाची व्याख्या करतानासुद्धा संत रामदास म्हणतात,

**'ज्ञान म्हणजे आत्मज्ञान ।**
**पहावे आपणाशी आपण या नावे (आत्म) ज्ञान ।।'**

म्हणून ज्या इंद्रियांची स्वाभाविक धाव ही बाहेर धावण्याची असते ती साधनेने, आत्मनिग्रहाने, संयमाने व वैराग्याने अंतःकरण प्रवृत्तीकडे वळवायला लागते. एखादा विरळा पुरुष आत्मसंयमाने इंद्रिये वश करून घेतो व आत्मज्ञान प्राप्त करतो. मग असा पुरुष या विषयरूपी मायानदीतून पार होतो. अपार शांती व अखंड प्रसन्नता प्राप्त करून त्याचे जीवन कृतकृत्य होते.

दुसऱ्या मंत्रात अविवेकी पुरुषाचे वर्णन आहे. जे विषयांच्या मोहात पडून भोगात रमलेले असतात ते आपले आयुष्य गमावून बसतात. अविद्या आणि अज्ञान यामुळे केवळ उपाधीत रमणारे असे लोक जन्म-मरणाच्या पाशातून सुटत नाहीत. आस्तिक्यबुद्धी बेताचीच असल्याने संत-सहवासात येऊनसुद्धा हा श्रेय मार्ग ते जाणत नाहीत व कृतीतही आणत नाहीत; परंतु जे सत्संगतीत राहतात ते श्रेय मार्गाचे अनुकरण करतात. अनित्य वस्तूंच्या मोहात न पडता

ते आत्म आणि अनात्म अशा वस्तूंत विवेक करतात. त्यामुळे अनंत आणि अमृतमय अशा आत्मलाभापलीकडे ते कशाचाच विचार करत नाहीत. विवेकी मनुष्याची पूर्णश्रद्धा ही शाश्वत वस्तूवरच असल्याने व अशा शाश्वत वस्तूनेच अंतिम सुख मिळते असा दृढभाव असल्याने ते विषय वस्तूंच्या मोहात कधीही पडत नाहीत.

## ।। मंत्र ३ ।।
## आत्मज्ञानी सर्वत्र असतो

**येन रूपं रसं गन्धं शब्दान्स्पर्शांश्च मैथुनान् ।**
**एतेनैव विजानाति किमत्र परिशिष्यते ।।**
**एतत् वै तत् ।।३।।**

### अन्वयार्थ

**येन रुपम् रसम् गन्धम्** - (प्रेरणेने) आत्म्याने मानव रूप, रस, गंध (जाणतो); **शब्दान् स्पर्शान् मैथुनान् च** - तसेच शब्द, स्पर्श आणि सुख-दुःखादी मैथुनजन्य द्वंद्वे - ज्याच्या मदतीने जाणतो त्या आत्म्याला या जगात समजून न घेता येण्यासारखे काय शिल्लक राहते? **एतत् वै तत्** - ज्याचा तू शोध घेत आहेस, 'ते हे आत्मतत्त्व होय.'

### भावार्थ

ज्या आत्म्यामुळे मानव रूप, रस, गंध, शब्द आणि सुखदुःखादी मैथुनजन्य सुखे निश्चयपूर्वक जाणतो, त्याला या जगात अविज्ञेय असे काय राहते? (तुला हवे असलेले आत्मतत्त्व) हेच ते खचितच होय.

## ।। मंत्र ४ ।।
## आत्मज्ञानी शोकरहित असतो

**स्वप्नान्तं जागरितान्तं चोभौ येनानुपश्यति ।**
**महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ।।४।।**



### अन्वयार्थ

- ज्याच्या साहाय्याने धैर्यवान (ज्ञानी) पुरुष स्वप्नांचा शेवट आणि जागृतावस्थेचा शेवट पाहतो; **(तम्) महान्तम् विभुम आत्मानम् मत्वा** - त्या महान सर्वव्यापी आत्म्याला जाणल्यावर; **सः** - ते दुःख करीत नाहीत.

### भावार्थ

ज्याच्यामुळे जागृती व स्वप्न ह्या दोन्ही अवस्थांतील पदार्थांना मनुष्य जाणतो तो महान व सर्वव्यापी आत्मा जाणिला असता पुरुष शोक करीत नाही.

शरीरात आत्मा हीच नित्य वस्तू आहे. बर्फाच्छादित उत्तुंग शिखरे बघितली की डोळे सुखावतात. श्रीखंड खाल्ले की जीभ संतुष्ट होते. मोगरीच्या गंधाने नासिका तुष्ट होते, कोकिळाच्या कुहू कुहू निनादाने कान सुखावतात, गुलाबाच्या पाकळीचा स्पर्श झाला की त्वचा रोमांचित होते व कामतृप्तीचा आनंद झाला की हृदय तृप्त होते. या सर्व संवेदना, जाणिवा कोणास होत असतात? ही आनंदाची अनुभूती खरे कोण अनुभवतो? वास्तविक इंद्रिये जड आहेत. पण या जड इंद्रियांना देहात राहून आत्मा चेतना निर्माण करतो. साक्षीरूपाने स्वतः राहून इंद्रियांना तो ज्ञान करून देतो. आत्म्याचे अधिष्ठान प्राप्त झाल्यावरच या जड इंद्रियांना चैतन्य मिळते. त्याच्या अधिष्ठानाशिवाय ही इंद्रिये निष्प्राण आणि अचेतन आहेत. शरीरात इंद्रिये तीच असतात पण आत साक्षीरूपाने असलेला चिन्मय निघून गेला की, ही इंद्रिये मातीप्रमाणे असतात. साक्षीरूपाने असलेला आत्माच या इंद्रियांना अनुभवाचे ज्ञान करून देतो. जागृतीतील जाणीव जशी आत्म्यामुळे होते तशी स्वप्नातील जाणीवही आत्म्यामुळेच होते. जे जे जाणले जाते ते ते सर्व आत्म्याच्याच अधिष्ठानामुळे. केनोपनिषदामध्येसुद्धा इंद्रिये कोणामुळे कार्यरत होतात या प्रश्नाला उत्तर देताना आत्म्याच्या अधिष्ठानाचेच वर्णन केले आहे. सर्व इंद्रिये ही उपकरणे आहेत पण ज्याच्यामुळे ही इंद्रिये कार्य करतात तोच मनुष्याचा हा आत्मा होय. जगातील कोणतीही गोष्ट या आत्मतत्त्वाला माहीत नाही असे होत नाही. प्रत्येकातील आत्मा हा त्या श्रेष्ठ परमतत्त्वाचाच अंश आहे. म्हणून नचिकेताला यमदेव म्हणतात, 'तुला जे समजून घ्यावयाचे होते, ज्याचा तू शोध घेत होतास तेच हे आत्मतत्त्व होय.'

आपल्या स्वतःसंबंधीचे ज्ञान ज्याला झाले आहे असा परिपूर्णत्वास पोहोचलेला पुरुष म्हणजे हा पृथ्वीतलावरील देवमानवच होय. असा पुरुष हा काही प्राप्त न झाले तरी दुःखी होत नाही. सुख-दुःखामध्ये समत्व प्राप्त झाल्यामुळे

त्याला कशाचीही आशा-आकांक्षा राहत नाही, त्यामुळे त्याला कधीही शोक होत नाही. जागृत अवस्थेमध्ये जे जाणवते व स्वप्नावस्थेमध्ये जे जे दर्शन होत असते ते ते सर्व आत्माच साक्षीरूपाने करून देत असतो. असा हा मोठ्याहून मोठा आत्मा प्रमाणांना विषय होत नाही.

## ।। मंत्र ५ ।।
## आत्मज्ञानी निर्भय असतो

**य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमन्तिकात् ।**
**ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ।।**
**एतद् वै तत् ।।५।।**

### अन्वयार्थ

जो ह्या आत्म्यास फळातील मध घेणारा (कर्मफलभोक्ता) असे; **भूतभव्यस्य काल त्रयस्य ईशानम्** - त्याच्याजवळ राहून भूत आणि भविष्य यांचा शास्ता; **अन्तिकात् वेद** - जवळून जाणतो; **न ततः (सः) विजुगुप्सते** - त्यानंतर तो कशालाही भीत नाही; तेच (निश्चित) हे आत्मतत्त्व होय.

### भावार्थ

या 'आत्म्या'स मधुभोक्ता (कर्मफळा), जीवनाचा पोषणकर्ता, भूतभविष्यकालत्रयाचा शास्ता असे जवळून जाणतो तो (ते ज्ञान झाल्यानंतर) भीती बाळगत नाही.

## ।। मंत्र ६ ।।
## ब्रह्मज्ञानाचे सार्वात्म्यदर्शन

**यः पूर्वं तपसो जातमद्भ्यः पूर्वमजायत ।**
**गुहां प्रविश्य तिष्ठन्तम् यो भूतेभिर्व्यपश्यत ।।**
**एतत् वै तत् ।।६।।**



### अन्वयार्थ

प्रथम तपापासून निर्माण झाला; जलादी महाभूतांच्या आधी उत्पन्न झाला; **(तम् प्रथमजम्)** - (त्या प्रथमजा ब्रह्माला); **गुहाम प्रविश्य तिष्ठन्तम्** - हृदयाच्या बुद्धिगुहेत स्थित झालेला; **यः भूतोभिः व्यपश्यत** - पंचभूतांसह पाहतो, तोच ब्रह्माला पाहतो, (त्याबद्दल पृच्छा केलीस) तेच ब्रह्म होय.

### भावार्थ

जो मुमुक्षु (ब्रह्मावरील) पहिल्या तपापासून (ज्ञानमय तप) उत्पन्न झालेला (हिरण्यगर्भ), जल आदी महाभूतांच्या अगोदर उत्पन्न झालेला आहे, तो बुद्धिरूप गुहेत सुस्थिर असा पाहतो, तोच ते (ब्रह्म) जाणतो तेच हे (ब्रह्म) होय.

## ।। मंत्र ७ ।।

**या प्राणेन संभवत्यदितिर्देवतामयी ।**
**गुहां प्रविश्य तिष्ठन्तिं या भूतेभिर्व्यजायत ।।**
**एतत् वै तत् ।।७।।**

### अन्वयार्थ

जो सर्व देवतांच्या स्वरूपात (हिरण्यगर्भ रूपाने) प्रगट होतो त्याला; **गृहाम् प्रविश्य निष्टान्तीम** - तसेच जो गुहेत प्रविष्ट होऊन राहतो त्याला; **या भूतेभिः व्यजायत** - जो पंचमहाभूतापासून निर्माण झाला त्याला जो जाणतो तोच ब्रह्म जाणतो; **एतत् वै तत्** - हेच ते 'ब्रह्म' होय.

### भावार्थ

जो देवतामयी आदिती प्राणरूपाने प्रगट होतो, तसेच जो बुद्धिरूप गुहेत प्रवेश करून त्यात स्थित झाला, आणि पंचमहाभूतांबरोबरच जन्मला असे मुमुक्षु जाणतो, तेच ब्रह्म होय. तेच हे ब्रह्म होय.

५ व्या मंत्रात आत्मस्वरूपाच्या स्वरूपाचे वर्णन आहे. परमात्मा म्हणजे शुद्ध चैतन्य परात्पर ब्रह्म जे निर्गुण आणि निराकार आहे. हाच सर्व आत्म्यांचा आत्मा आहे असे शास्त्र सांगते. हा परमात्मा ब्रह्मांडात पुरुषरूपाने आणि पिंडात जीवरूपाने ओळखला जातो. जेव्हा तो अंतःकरणात प्रवेश करतो तेव्हा तो मन, बुद्धी, चित् आणि अहंकाररूपे ओळखला जातो. जीव हा वास्तविक

ईश्वराचा अंश, परंतु त्याची देहात देहबुद्धी झाल्यामुळे म्हणजे हा देह म्हणजेच मी असे तो मानू लागल्यामुळे तो स्वतः आपल्या खऱ्या रूपाला विसरतो. मन अति चंचल असल्यामुळे ते संकल्प विकल्परूपी जाळे पसरून भय, शोक आणि दुःखाचे काळे ढग निर्माण करते. आपल्या दाही इंद्रियांत परमात्मा चैतन्यद्वारा क्रियाशक्ती उत्पन्न करतो त्यामुळेच कान ऐकू शकतात, डोळे पाहू शकतात. सर्व इंद्रियांना आणि त्याच्या विविध विषयांना नारायण चेतना पुरवून ज्योतिर्मय, चैतन्यमय बनवतो आणि स्वतःच जीव बनून विषयांचे सेवन करतो. परंतु ज्याला आत्मज्ञान झाले आहे तो जीवात्मा व ईश्वरात्मा हे प्रज्ञेने एकरूपच मानून विकारांच्या पलीकडे जातो. मग त्याला द्वैताचे भय राहत नाही. तो भय विसरून जातो आणि शोकरहित होतो. आपल्यातील ईश्वरीशक्तीच ही नियंता आहे हे पक्के जाणल्यामुळे त्या कल्पनामय 'मी'चे राग-द्वेष, सुख-दुःख, भय-शोक हे सर्वच निघून जातात. कारण ज्याच्यापासून रक्षण करावयाचे व ज्याचे रक्षण करावयाचे हे दोन्ही मीच असल्याने मग भय कोणाचे बाळगायचे?

नचिकेताने विचारलेल्या आत्मज्ञानाचा विस्तार ६ व्या मंत्रात यमदेव करीत आहेत. समष्टी पातळीवर 'परमोच्च सत्यतत्त्व' म्हणजे 'हिरण्यगर्भ' होय. आणि व्यष्टी पातळीवर तो जीव होय. जलाच्याही पूर्वी हा हिरण्यगर्भ किंवा ब्रह्म हे जन्मले. या ठिकाणी अद् हा शब्द पंचमहाभूतांकरिता वापरलेला आहे. या मंत्रात विश्वनिर्मितीच्या प्रक्रियेची माहिती दिली आहे. अशा विश्वनिर्मितीच्या प्रक्रियेच्या सिद्धांताबाबत दोन उपनिषदांमध्ये एकवाक्यता आढळतेच असे नाही. तैत्तिरीय उपनिषदात 'एकोऽहम् बहुस्याम्' या मंत्रात परमेश्वराने आपले एकाकीपण सोडून अशी इच्छा केली की, आपण बहु व्हावे आणि त्यातूनच पुढे सृष्टी निर्माण झाली. जेव्हा हिरण्यगर्भापासून आणि जीवापासून उपाधी गळून पडतात तेव्हा ते दोन्हीही परमतत्त्वच होतात. नचिकेताने ज्याचा शोध घेण्याचे ठरविले ते हेच परब्रह्म होय असे यमराज सांगतात. म्हणजे सुरुवातीस हिरण्यगर्भ नंतर पंचमहाभूतें व देव, आदिदेह हे निर्माण झाले. त्यांच्या बुद्धिरूप गुहेत म्हणजे हृदयस्थ होऊन हिरण्यगर्भरूप ईश्वर सुखदुःखात्मक भोग जीवाला घडवितो. अशा हिरण्यगर्भाला जाणून त्याचीच आत्मा म्हणून जो उपासना करतो त्यालाच ब्रह्मज्ञान प्राप्त होते.

७ व्या मंत्रात हेच पुन्हा प्रतिपादिले आहे. या ठिकाणी हिरण्यगर्भाला आदिती म्हटले आहे व तीच प्राणरूपाने आणि भोक्तारूपाने देहात राहते. नचिकेताने ज्या संबंधी जिज्ञासा दाखविली होती ते हे ब्रह्मतत्त्व अग्नीच्या स्वरूपात गुप्तरूपाने राहते.



## ।। मंत्र ८ ।।

**अरण्योर्निहितो जातवेदा**
**गर्भ इव सुभृतो गर्भिणीभिः ।**
**दिवे दिव ईड्यो जागृवद्भिः**
**हविष्मभ्दिर्मनुष्येभिरग्निः ।।**
**एतत् वै तत् ।।८।।**

### अन्वयार्थ

गर्भिणीने (उदरात) सुरक्षित ठेवलेल्या गर्भाप्रमाणे; **अरण्योः निहितः जातवेदाः अग्निः** - दोन लाकडांच्या तुकड्यांमध्ये ठेवलेल्या जातवेदा नावाचा अग्नी - हविर्द्रव्यांनी युक्त अशा प्रमादशून्य पुरुषांकडून प्रतिदिनी स्तुतिपात्र समजला जातो. (च्ययन केला जातो); **एतत् वै तत् (ब्रह्म)** - तेच हे ब्रह्म होय.

### भावार्थ

गर्भिणीने आपल्या उदरात गर्भ सुरक्षित ठेवलेला असतो त्याचप्रमाणे दोन लाकडांच्या तुकड्यामध्ये ठेवलेला जातवेदा नावाचा अग्नी प्रमादशून्य हविर्द्रव्यांनी युक्त अशा ऋत्विजांकडून नित्य स्तुतियोग्य (च्ययनीय) समजला जातो, तेच हे ब्रह्म होय.

सर्व पूजाविधी एकाच हविर्भाग स्वीकारणाऱ्या परमतत्त्वापर्यंत पोहोचतात. या अर्थाने ज्ञान्यांचे ब्रह्म आणि प्रापंचिकांचा यज्ञाग्नी एकच आहे. वैदिक यज्ञयाग करताना दोन लाकडांचे तुकडे एकमेकावर घासून यज्ञकुंडात प्रस्थापित करण्याकरता हा पवित्र यज्ञाग्नी निर्माण केला जातो. हाच अग्नी हवन कुंडात स्थापिला जातो. पूर्णाहूतीच्या शेवटापर्यंत सर्व यज्ञात हा अग्नी प्रज्वलित ठेवला जातो. मातृत्वाच्या प्रेमळपणाने व वात्सल्याने गरोदर स्त्री जशी गर्भाच्या पोषणाविषयी दक्ष असते त्याप्रमाणे यज्ञाच्या प्रारंभापासून पूर्णाहूतीच्या शेवटापर्यंत हा अग्नी अत्यंत काळजीपूर्वक यजमानाकडून रक्षिला जातो. असा हा पवित्र झालेला अग्नी त्यांच्याकडून स्तवन केला जातो. ध्यानसाधनेद्वारा ऋषींनी आपल्या हृदयात पूजिलेल्या याच ब्रह्माची यज्ञाग्नी म्हणून पूजा केली जाते. हे नचिकेता, अपरब्रह्मस्वरूप असलेला हा अग्नी जो जाणतो तो ब्रह्मज्ञ होतो.

## ।। मंत्र ९ ।।
## प्राणात ब्रह्मदृष्टी

**यतश्चोदेति सूर्योऽस्तं यत्र च गच्छति ।**
**तं देवाः सर्वे अर्पितास्तदु नात्येति कश्चन ।।**
**एतद्वै तत् ।।९।।**

### अन्वयार्थ

**यतः च सूर्यः उदेति** - ज्याच्यामुळे सूर्य उगवतो; **यत्र च अस्तम् गच्छति** - आणि ज्या ठिकाणी तो अस्ताला जातो; **सर्वे देवाः तम् अर्पिता** - सर्व देवता त्यावर अवलंबून असतात, त्याच्या आज्ञा कोणी ओलांडीत नाहीत. **एतत् वै तत्** - हेच ते ब्रह्म होय.

### भावार्थ

ज्या (ब्रह्मतत्त्वा)पासून सूर्य उदय पावतो व ज्यात सूर्याचा अस्त होतो त्याच्यावरच सर्व देव अधिष्ठित आहेत (सर्व देवांना त्याचाच आधार आहे). त्याचे अतिक्रमण कोणीही करू शकत नाही. (ज्याची मर्यादा कोणालाही उल्लंघिता येत नाही) तेच हे ब्रह्मतत्त्व होय.

## ।। मंत्र १० ।।
## द्वैतबुद्धीने पुनर्जन्म

**यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह**
**मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ।।१०।।**

### अन्वयार्थ

**यत् एव इह** - जे (तत्त्व) या जगात दृश्यमान असते; **तत् अमुत्र (ब्रह्म)** - तेच त्या ठिकाणी 'ब्रह्म' म्हणून असते; **यत् अमुत्र तत् नु इह** - त्या ठिकाणी जे आहे ते तेच येथे आहे; **यः इह नाना इव पश्यति** - जो या जगात (ब्रह्म आणि जगत यात) नानात्व पाहतो; तो एका मृत्यूपासून दुसरा मृत्यू प्राप्त करून घेतो (अनेक जन्म घेतो).



### भावार्थ

जे तत्त्व ह्या (देहेन्द्रिय संघाता) मध्ये भासते, तेच त्याच्या पलीकडील आहे व जे अन्यत्र आहे तेच ह्यात आहे. जो मनुष्य या तत्त्वात विविधता पाहतो तो मरणानंतर (जन्ममरणरूप) मृत्यूलाच प्राप्त होतो.

९ व्या मंत्रात या आत्मतत्त्वाचे व्यापकत्व सांगितले आहे. ईश्वराने हे सारे जग व्यापले आहे. जी जी वस्तू, वैभव, लक्ष्मी, तेज यांनी युक्त आहे ती ती वस्तू त्या परमतत्त्वाच्या तेजाच्या अंशापासून झाली आहे. तोच वैश्वानररूप अग्नी होऊन प्राण्यांच्या देहात राहिला आहे. सर्वांच्या हृदयात तोच अधिष्ठित आहे. जे तेज सूर्यामध्ये असून सर्व जगाला प्रकाशित करते ते तेज जे चंद्रात आणि अग्नीतही आहे ते त्या परमात्म्याचेच आहे. त्याने व्यापले नाही असे ठिकाण ब्रह्मांडात शोधूनही सापडणार नाही. मी माझ्या एकाच अंशाने हे जग व्यापून राहिलो आहे असे भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात.

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत ।।१०.४२।।**

सर्व देवता, मनुष्य, पंचमहाभूतात्मक संपूर्ण सृष्टी या सर्वांचे अधिष्ठान तो एक परम आत्मा आहे. एकच परमात्मा विविध नामरूपांनी नटला आहे. या देहातील प्राणरूप आत्मतत्त्वाला जो जाणतो तो ब्रह्मरूपच होतो. हाच विचार १० व्या मंत्रात पुढे व्यक्त झाला आहे. जीव, जीवात्मा, जगदीश्वर हे सर्व एकरूपच आहेत. शुद्ध चैतन्य परात्पर ब्रह्मच मायेच्या गुणांचा स्वेच्छेने स्वीकार करून ईश्वररूप बनते आणि तोच ईश्वर त्याच्या भिन्नभिन्न कार्यक्षेत्रांच्या दृष्टीने ब्रह्मा, विष्णू, महेश अशा निरनिराळ्या नावांनी ओळखला जातो, परंतु तात्त्विक दृष्ट्या विचार करता ही तीनही रूपे, शुद्ध, चैतन्य, परात्पर ब्रह्माचीच नावे आहेत. मूलतः त्या सर्वांचे एकच स्वरूप आहे. सत्व, रज व तम या भिन्न गुणांपासून उत्पन्न झाल्याने हे तीन अवतार भिन्न आहेत असेच वाटते. जसे गंगा नदी एकच आहे परंतु ती आकाशात असताना तिला मंदाकिनी म्हणतात, पृथ्वीवर अवतरली असता तिचे भागीरथी असे नाव होते आणि पातळात तिला भोगावती असे म्हणतात. तसे विशिष्ट कर्मानुसार या परब्रह्माची विविध रूपे आहेत. असा जो भेदरहित विशुद्ध परब्रह्म आहे त्याला अज्ञानी लोक विविध रूपात पाहतात. हे सर्व एकरूपच आहेत, पण त्यांची नामरूपता लक्षात घेऊन त्यांच्यामध्ये भेद पाहतात. जीव हा त्याचाच अंश आहे पण त्यालासुद्धा ते भेदरूपाने पाहतात. अविद्या आणि अज्ञान यांच्यामुळे जे लोक ही भिन्नता पाहतात त्यांना हा जन्म-मरणाचा फेरा चुकविता येत नाही, म्हणून सतत साधना करायची, ती या जीवब्रह्म ऐक्याचीच. ही साधना जेव्हा फलरूप होते त्या वेळी तो या जन्म-मरणाच्या फेऱ्यातून मुक्त होतो.

## ।। मंत्र ११ ।।

**मनसैवेदमाप्तव्यं नेह नानाऽस्ति किञ्चन**
**मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति ।।११।।**

**अन्वयार्थ**

हे (ब्रह्म) केवळ मनानेच प्राप्त करून घेता येते. या ब्रह्मतत्त्वात वैविध्य नाहीच; **यः इह नाना इव पश्यति** - जो या ठिकाणी (या जगतात) नानात्व पाहतो; **सः मृत्योः मृत्यम् गच्छति** - तो एका मृत्यूपासून दुसऱ्या मृत्यूपर्यंत जातो.

**भावार्थ**

हे ब्रह्म केवळ मनानेच प्राप्त करून घेता येते. या ब्रह्मतत्त्वात वैविध्य नाहीच. या जगतात जो नानात्व पाहतो तो जन्म-मृत्यूच्या फेऱ्यात सापडतो.

मनुष्याला मन हे दिव्य साधन भगवंतांनी दिले आहे. मनुष्याच्या बंधनाला व मोक्षाला कारण मनच आहे.

'मनः एव कारणं बन्धमोक्षयोः' असे शास्त्राने म्हटले आहे. असे मन संयमित व सुसंस्कृत करून सुनियंत्रित करावयाचे असते. जेव्हा ते सुसंस्कारित होते त्या वेळी ध्यानसाधनेने अशा मनाला 'अमन' करायचे. असे हे मन ईश्वराची विभूतीच आहे. या मनाला उत्तम बोध करून त्याला शुद्ध, पवित्र व निर्मळ करावयाचे आहे. परमपूजनीय गौडपादाचार्यांनी ह्यालाच 'अमन' असे म्हटले आहे. काहीजण या अवस्थेला उन्मनी अवस्था असे म्हणतात. मनाच्या ह्याच अवस्थेत साधकाला आत्मतत्त्वाची अनुभूती येत असते. अशी अनुभूती आली की, मग उपाधी गळून पडते आणि आत-बाहेर सर्वत्र त्याला एकत्वाचा अनुभव यायला लागतो. शुद्ध मन म्हणजेच शुद्ध आत्माच. जीवात्म्याला सतत आत्मस्वरूपाचे अनुसंधान देऊन श्रवण, मनन, चिंतन, निदिध्यासन या सर्व साधनांनी त्या मनाला आत्मबोध करून द्यावयाचा असते. असा आत्मबोध ज्याला होत नाही तो जीव संसाराच्या भेदमय अवस्थेत अडकून पडतो व जन्म-मरणाच्या फेऱ्यात तो सापडतो.



## ।। मंत्र १२ ।।

## हृदयस्वरूप कमळात राहणारे ब्रह्म

**अंगुष्ठमात्रः पुरूषो मध्य आत्मनि तिष्ठति ।**
**ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते ।।**
**एतत् वै तत् ।।१२।।**

**अन्वयार्थ**

**अंगुष्ठमात्रः पुरूषः** - जो अंगठ्याच्या आकाराचा हा पुरुष; **मध्य आत्मनि तिष्ठति** - शरीराच्या मध्ये स्थित आहे; त्याला (आत्म्याला) भूत-भविष्याचा शास्ता म्हणून जाणतो; **ततः न विजुगुप्सते** - त्यानंतर तो (जाणणारा) कोणाला भीत नाही; **एतत् वै तत्** - तेच हे (ब्रह्म) होय.

**भावार्थ**

'अंगुष्ठमात्र' असा जो 'पुरुष' शरीराच्या मध्यात (हृदयात) भूतभविष्याचा शास्ता म्हणून राहतो आणि तो (मुमुक्षु) हे जाणल्यानंतर कशालाही भीत नाही, तेच हे ब्रह्म होय.

## ।। मंत्र १३ ।।

**अंगुष्ठमात्रः पुरूषो ज्योतिरिवाधूमकः ।**
**ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्वः ।।**
**एतत् वै तद् ।।१३।।**

**अन्वयार्थ**

धुराशिवाय जशी ज्योत त्याप्रमाणे अंगठ्याच्या आकाराचा हा पुरुष; **भूतभव्यस्य ईशानः** - भूतभविष्य यांचा नियंता; **सः एव अद्य** - तोच केवळ अज आहे; **स उ श्वः** - तोच भविष्यकालीही असणार; **एतत् वै तत्** - तेच हे (ब्रह्म) होय.

भावार्थ

हा अंगठ्याएवढा पुरुष धूररहित ज्योतीप्रमाणे आहे. हा भूतभविष्याचा शास्ता आहे. तोच आज आहे, उद्या असणार आहे व तोच निश्चित ते (ब्रह्म) आहे.

## ।। मंत्र १४ ।।
## भेददृष्टीचे फळ

**यथोदकं दुर्गे वृष्टं पर्वतेषु विधावति ।**
**एवं धर्मान् पृथक् पश्यन् तानेवानेवानुधावति ।।१४।।**

अन्वयार्थ

**यथा** - ज्याप्रमाणे डोंगरकड्यावर पडलेली पर्जन्यवृष्टी पर्वतावरून खाली वाहत जाते; त्याप्रमाणे जो साधक वस्तुमात्रांना पृथक् पृथक् पाहतो. **(सः) तान् एव अनुविधावति** - तो जीव त्याच्या भिन्न भिन्न शरीरभेदाचे अनुसरण करणाऱ्यांच्या मागे धावत राहतो.

भावार्थ

जसे, पाणी पर्वत-कड्यावर पर्जन्यवृष्टी झाली असताना पर्वतावरून खाली सर्वत्र वाहते, तद्वतच जो वस्तुमात्रामध्ये नानात्व पाहतो तो त्यांच्यामागे सर्वदा धावतो.

## ।।१५।।
## अभेद दर्शनाचे फळ

**यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ।**
**एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ।।१५।।**

अन्वयार्थ

जसे शुद्ध पाण्यात शुद्ध पाणी ओतल्यास; **तादृक् एव भवति** - केवळ त्याच्यासारखेच होते; **गौतम** - हे गौतम; **विजानतः मुनेः आत्मा एवं भवति** - हे ज्याला समजते त्याचा आत्मा तसाच होतो.



भावार्थ

ज्याप्रमाणे शुद्ध पाण्यात मिसळलेले शुद्ध पाणी त्यातच पूर्णपणे मिसळते याप्रमाणे हे गौतमा, विज्ञानी मुनीचा आत्माही (ब्रह्म) होऊन राहतो.

१२ व्या मंत्रात आत्मरूपाचे वर्णन आहे. भगवद्गीतेत अनेक ठिकाणी या अंतरात्म्याचे वर्णन आलेले आहे. पंधराव्या अध्यायात भगवंत म्हणतात,

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो**
**मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो**
**वेदांतकृद्वेदविदेव चाहम् ।।१५।।**

**अर्थ** - तसेच सर्वांच्या हृदयात मी अधिष्ठित असून, स्मृती, ज्ञान व अपोहन म्हणजे तन्नाश, ही माझ्यापासूनच होतात आणि सर्व वेदांनी जे काय जाणावयाचे ते मीच. वेदान्ताचा कर्ता आणि वेद जाणणाराही मी.

मनुष्याच्या अंतःकरणात हा आत्मा अंगठ्याएवढा असतो असे म्हटले आहे. वास्तविक आत्मा हा निराकार, निर्गुण, व्यापक असा आहे. त्याला मोजमाप नाही. अशा सर्वव्यापी सत्य तत्त्वास अंगठ्याच्या आकारावर मर्यादित करणे हे बुद्धीला न पटणारे आहे, पण जो हृदयाच्या केंद्रस्थानी असतो अशी श्रद्धा ठेवून त्या पुरुषाचे चित्तैकाग्रतेने ध्यान करण्यासाठी हे सर्वव्यापी आत्मतत्त्व केंद्रित झाले आहे. हे आलंबन ध्यान करण्यास निश्चित उपयुक्त आहे. हृदयरूप कमळाच्या पोकळीत आत्मा हा त्या देहाचा मालक होऊन द्रष्टारूपाने जीवाचे सर्व व्यवहार पाहत असतो. असा हा आत्मा तीनही काळांचा नियंता असून सर्व ब्रह्मांडाला व्यापून राहतो. आत्म्याचे हे स्वरूप जाणणारा पुरुष हा निर्भय होतो. द्वैतभाव संपल्यामुळे देहात्मकता संपते, त्यामुळे प्रेयरूप अशा देहाविषयी त्याला कोणतीही भीती राहत नाही. असा हा देह राहो अथवा जावो पण आत्मारूपाने माझे अस्तित्व राहणारच. कारण तो नित्य आहे असा दृढभाव मनात असल्यामुळे त्याला देहाचे रक्षण करण्याची इच्छा राहत नाही.

मनुष्याच्या हृदयात नियंता व चैतन्य म्हणून राहणारा हा आत्मा ज्योतिस्वरूप आहे, कारण जिथे जिथे तेज, प्रकाश, शक्ती आहे तेथे तेथे त्याचेच अस्तित्व आहे. साधक ह्याच अंगुष्ठमात्र ज्योतीचे ध्यान करून सच्चिदानंद अशा परमज्योतीमध्ये तादात्म्य पावतात. ही आत्मज्योतीच शाश्वत व शासक आहे. तीच त्रैकालिक सत्यस्वरूप आहे. ब्रह्मस्वरूप अशा या ज्योतीला जाणून साधक ब्रह्मज्ञ होतो.

आणि जो साधक अशा प्रमाणे ज्योतीला जाणत नाही त्याचा आत्मनाश हा अटळ आहे. उपनिषदांचा उद्घोष असा आहे की, ह्या सर्व विश्वात तो एकत्वाने व्यापून राहिला आहे, पण याचा बोध न करून घेता देहबुद्धीने ते 'मी माझे' या सांसारिक घोषात रममाण झालेले असतात. अशा मनुष्यास आत्म्याचे हे एकत्व समजत नाही. अज्ञान आणि भ्रांतीमुळे तो आत्म्यात अनेकत्व पाहतो. असा पुरुष या भेददृष्टीमुळे जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडतो. जेथे जेथे हे द्वंद्व असते तेथे तेथे विकार निर्माण होतात, त्यामुळे अशा भेददृष्टीने जगाकडे पाहणाऱ्यांचा विनाश होतो.

या वल्लीच्या शेवटच्या मंत्रात साधकाला दिलासा दिला आहे. त्यासाठी पाण्याचा दृष्टांत योजला आहे. शुद्ध जलात शुद्ध जल ओतले म्हणजे ते शुद्धच होते, तसे मनुष्यामध्ये स्थित असलेला दिव्य, चेतनायुक्त आत्मा आणि अखिल ब्रह्मांड व चराचर सृष्टी व्यापून राहिलेला परमात्मा यांचे ऐक्य झाले असता जसे घटातील आकाश घट फुटल्यावर महत आकाशाशी एकरूप होते तसा तोही एकरूप होतो. जीव-शिवाचे हे मिलन त्याचे जीवन कृतकृत्य करते. आपल्यातील अहंभावनेचा संपूर्ण नाश होणे म्हणजे देवत्वाची प्रचिती येण्यासारखे आहे. जेव्हा आपले अज्ञान, भ्रांती, आसक्ती निघून जाते त्या वेळी आपला जीवात्मा शुद्ध होतो. त्यास स्वतःच्या आत्मस्वरूपाची शुद्ध जाणीवतत्त्व म्हणून अनुभूती येते. हंस आपल्या हंसीला ओळखतो व आपणही त्या सर्वव्यापी, अमर अशा परमात्म तत्त्वाप्रमाणेच आहोत याचा साक्षात्कार त्याला होतो. हे नचिकेता! हे ज्याला समजते त्याला दिव्य परमात्म्याची अनुभूती येते.

***येथे द्वितीय अध्यायातील प्रथम वल्ली समाप्त होते.***

×××



# अध्याय दुसरा - द्वितीय वल्ली

## ।। मंत्र १ ।।

## आत्मानुसंधान

**पुरमेकादशद्वारमजस्यावक्रचेतसः ।**
**अनुष्ठाय न शोचति विमुक्तश्च विमुच्यते ।।**
**एतद्वै तत ।।१।।**

### अन्वयार्थ

ज्याचा मार्ग सरळ आहे (नित्यविज्ञान स्वरूप) अशा अजन्मा (आत्म्याचे) शहरास अकरा दरवाजे असतात; **(तम्) अनुष्ठाय न शोचति** - त्याचे ध्यान केल्यावर (मानव) शोक करीत नाही. **विमुक्तः च विमुच्यते** - कर्मबंधनापासून विदेह मुक्त होतो. **एतत् वै तत्** - तेच हे (निश्चयपूर्वक) ब्रह्म होय.

### भावार्थ

ज्याचे ज्ञान नित्यस्वरूप असते, त्या अजन्मा (ब्रह्माच्या) शहरास अकरा दरवाजे असतात. त्याचे ध्यान केल्यावर शोक करीत नाही; आणि (अविद्या कर्मबंधनातून) तो जीवनमुक्त होऊन तो विदेहमुक्त होतो. तेच हे निश्चयपूर्वक (ब्रह्म) होय.

## ।। मंत्र २ ।।

**हँ सः शुचिषद् वसुरन्तरिक्षस-**
**द्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् ।**
**नृषद वरसदृतसद् व्योमसदब्जा**
**गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ।।२।।**

### अन्वयार्थ

**सः हंसः शुचिषद्** - तो (आत्मा) स्वर्गात सूर्य म्हणून; **वसुअन्तरिक्षसद्** - आकाशात वायू म्हणून; **होता वेदिषद्** - पृथ्वीवर (यज्ञकुंडात) अग्नी म्हणून; (गृहस्थीच्या घरात अतिथी म्हणून); **नृषद् मानवातः वरसद्** - देवतांमध्ये; **क्रतुसद्** - यज्ञयागात; **व्योमसद्** - आकाशात (राहतो) असा तो; **अब्जा** - पाण्यात जन्मलेला; **गोजा** - पृथ्वीवर निर्माण होणारा; **ऋतजा** - यज्ञात च्ययन होणारा; **अद्रिजा** - गिरीशिखरावर निर्माण होणारा; **ऋतम्** - असा तो सत्य स्वरूप; **बृहत्** - महान आहे.

### भावार्थ

तो आत्मा स्वर्गात सूर्य म्हणून, आकाशात वायू म्हणून, यज्ञकुंडात (पृथ्वीवर) अग्नी म्हणून, घरात अतिथी म्हणून, मानवात, देवतांमध्ये, यज्ञयागात, आकाशात राहतो असा तो पाण्यात जन्मलेला, पृथ्वीवर निर्माण होणारा, यज्ञात च्ययन केला जाणारा, पर्वतावर निर्माण होणारा सत्यस्वरूप व महान आहे.

## ।। मंत्र ३ ।।

**ऊर्ध्वं प्राणमुन्नयत्यपानं प्रत्यगस्यति ।**
**मध्ये वामनमासीनं विश्वे देवा उपासते ।।३।।**

### अन्वयार्थ

(तो हृदयस्थ पुरुष) शरीरातील 'प्राण' वायूला वर नेतो; **अपानम् प्रत्यगस्यति** - 'अपान' वायूला खाली ढकलतो. सर्व देवता (चक्षुरादी) हृदयामध्ये राहणाऱ्या पूजनीय पुरुषाची आराधना करतात.

### भावार्थ

(जो) प्राणाला वर घेऊन जातो व अपानाला खाली ढकलतो अशा ह्या हृदयस्थ वामनाची (आत्म्याची) सर्व (इंद्रियस्थ) देवता उपासना करतात.

यमराज नचिकेताला आत्म्याचे माहात्म्य सांगत आहेत. हे सांगण्यासाठी यमदेवानी नगराचा दृष्टांत सांगितला आहे. हे मानव शरीर म्हणजे जणू काय एक नगर आहे. नगराला जशा वेशी असतात तशा या शरीर नगरालाही दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, मुख, नाभी आणि दोन खालची छिद्रे आणि



टाळूमधील ब्रह्मरंध्र अशा अकरा वेशी आहेत. नगराच्या द्वारावर जसा शूर द्वाररक्षक असतो त्याप्रमाणे इंद्रियरूप द्वारावरही त्याच्या देवता असतात. मन, बुद्धी, अहंकार, इंद्रिये, त्वचा इत्यादी हे त्या शरीर नगरातील पहारेकरी, मंत्री, भाट वगैरे होत. नगराचा स्वामी जसा राजा असतो तसा या शरीराचा जो स्वामी आहे तोच या शरीराचे सर्व व्यवहार करतो. त्याच्याच आज्ञेने ह्या शरीरातील इंद्रिये, प्राण, मनबुद्धी, अहंकार यांचे सर्व व्यवहार होत असतात. तोच आत्मा ह्या शरीरात सर्वत्र व्यापून राहिला आहे, पण शरीराच्या सर्व व्यवहारापासून तो वेगळा व अलिप्त आहे. या शरीरातील त्या सर्वगत, सर्वातीत राजाचे नाव आहे आत्मा आणि असा आत्मा जाणला असता शोक, भय इत्यादी न राहून तो आनंदस्वरूप होतो. या पहिल्याच मंत्रात आत्म्याची नगरातील राजाशी तुलना केली आहे.

दुसऱ्या मंत्रात त्या आत्म्याचे व्यापक स्वरूप वर्णिले आहे. हा आत्मरूप हंस चालू लागला म्हणजे तोच सूर्यरूपाने उगवतो, मावळतो व सर्व व्यापून राहत असल्याने त्याला वसू असे म्हणतात. तोच वायूरूपाने पळतो, अग्नीरूपाने जळतो व पृथ्वीच्या आतमध्ये राहतो. द्रोणातील सोमरूप आत्म्याला किंवा घरात येणाऱ्या अतिथीरूप आत्म्याला 'दूरोणसत्' असे म्हणतात. मनुष्य देहात त्याला नृषत् असे म्हणतात. विश्वातील निरनिराळी रूपे आणि सजीव प्राणी यांची एक यादीच या श्लोकात मिळते. पृथ्वीवर धनधान्ये, वनस्पती, वृक्ष अशा अनेक रूपांनी तो उगवला की, त्याला गोजा असे म्हणतात. शंख, शिंपले, मासे, किडे अशा सर्वच रूपांनी जेव्हा तो येतो त्याला अब्जा असे म्हणतात. उंच डोंगरावर जन्मून पायथ्याशी उडी घेणाऱ्या नदीरूप आत्म्याला अद्रिजा असे नाव आहे. असा नामरूपात्मक आत्मा सर्वत्र व्यापलेला आहे. तरी तो ऋत् असा भेदशून्य अखंड अव्यय व एकटाच आहे. तोच या व्याप्त जगाला कारण असून त्याला बृहत् असे नाव आहे. तोच या जगाचा पिता आहे.

तिसऱ्या मंत्रात अशा अंगुष्ठमात्र व हृदयात राहणाऱ्या आत्म्याच्या कार्याचे वर्णन आहे. तो प्राणाला वर नेऊन अपानाला खाली नेतो. आपल्या शरीरातील प्राणशक्तीचा प्रवाह खेळत ठेवून तो संपूर्ण शरीराला कार्यरत करतो. प्राण ही जीवनशक्ती आहे, आणि श्वासोच्छ्वास हा त्याच्या अभिव्यक्तीपैकी एक अभिव्यक्ती आहे. अन्नाशय व आतडे यामध्ये ती प्राणशक्ती जेव्हा कार्य करते तेव्हा ती 'अपान' होय. सर्व देवता या आत्म्याची पूजा करतात. येथे देव म्हणजे स्वर्गस्थदेव नसून ती मानवाच्या पाच ज्ञानेंद्रियांच्या पाच अधिष्ठात्री देवता असणारी पंचमहाभूते होत. या सर्व देवता त्या अंगुष्ठमात्र आत्म्याच्या

कृपेने कार्यरत होतात. त्यामुळे या सर्वांना संजीवनी देणारा जो आत्मा आहे त्यालाच या देवता समर्पित होतात.

## ।। मंत्र ४ ।।

**अस्य विस्त्रंसमानस्य शरीरस्थस्य देहिनः ।**
**देहाद्विमुच्यमानस्य किमत्र परिशिष्यते ।।**
**एतद्वै तत् ।।४।।**

### अन्वयार्थ

**शरीरस्थस्य** - शरीरात राहणाऱ्या देह सोडून जाऊन त्यापासून अलग होणाऱ्या; **अस्य देहिनः** - या देहीचे; **किम् अत्र परिशिष्यते** - येथे काय शिल्लक राहते? (अर्थात काही नाही) हेच ते खचितच ब्रह्म होय; **एतत् वै तत्** - हेच ते होय.

### भावार्थ

हा देहस्थ (आत्मा) देहापासून अलग होऊन (देह) सोडून गेल्यावर त्यात काय शिल्लक राहते? अर्थात काही शिल्लक राहत नाही. हेच ते ब्रह्मतत्त्व होय.

## ।। मंत्र ५ ।।

**न प्राणेन नापानेन मर्त्यो जीवति कश्चन ।**
**इतरेण तु जीवन्ति यस्मिन्नेतावुपाश्रीतौ ।।५ ।।**

### अन्वयार्थ

कोणीही मर्त्य 'प्राण' व 'अपान' या प्राणशक्तीवर जगत नाही. **यस्मिन् एतौ उपाश्रितौ इतरेण तु जीवन्ति** - (परंतु) ज्यावर हे दोन्हीही अवलंबून असतात अशा आणखी कशामुळे तरी जिवंत असतात.

### भावार्थ

मरणशील (प्राणी) प्राणामुळे वा अपानामुळे जिवंत राहत नाही. हे दोन्ही



ज्याच्यावर आश्रित आहेत त्याच्या (आत्मा) योगानेच सर्व प्राणी जिवंत राहतात.

मनुष्याचे शरीर मर्त्य आहे पण आत्मा अमर आहे. शरीर अनित्य आहे तर आत्मा नित्य आहे. सर्व इंद्रिये, मनबुद्धी ही केवळ त्याच्याच आश्रयाने प्राणरूप झालेली असतात. जेव्हा हे पंचमहाभूतांचे शरीर, हा देहाचा स्वामी म्हणजे आत्मा, हा देह सोडून जातो त्या वेळी ते शरीर म्हणजे केवळ पालापाचोळा. मातीचे शरीर मातीतच जाण्याच्या पात्रतेचे होते. जोपर्यंत हा चिन्मय त्या मृण्मय शरीरात होता तोपर्यंतच ते मातीचे खेळणे हालत होते, डुलत होते. पण जेव्हा चिन्मय देहातून निघून जातो त्या वेळी तो भस्मीभूत होण्याच्याच पात्रतेचा राहतो.

या आत्म्यामुळेच सर्व इंद्रिये, मनबुद्धी ही शरीराला जगवीत असतात. प्राणालाही प्राणस्वरूप असणारा आत्माच जीवाला चेतना देत असतो. अष्टदा प्रकृतीने जरी हा देह होत असला तरी या आत्मतत्त्वाशिवाय देह चेतनामय होत नाही. मरणाच्या वेळी हा आत्मा देहाबाहेर जेव्हा निघून जातो त्या वेळी त्या शरीराचा मृत्यू झाला असे म्हणतात.

## ।। मंत्र ६ - ७ ।।

**हन्त त इदं प्रवक्ष्यामि गुह्यं ब्रह्म सनातनम् ।**
**यथा च मरणं प्राप्य आत्मा भवित गौतम ।।६।।**

### अन्वयार्थ

**हन्त** - ठीक, **गौतम** - हे गौतम; मी तुला हे गूढ आणि सनातन ब्रह्म (म्हणजे काय ते) स्पष्ट करून सांगतो; **यथा च मरणम् प्राप्य आत्मा भवति** - त्याचप्रमाणे मृत्यूनंतर आत्म्याचे काय होते तेही.

### भावार्थ

असो! हे गौतमा! ह्या गुप्त व सनातन ब्रह्माचे मी निरूपण करतो. तसेच मरणानंतर आत्म्याला काय गती मिळते तेही सांगतो.

**योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः ।**
**स्थाणुमन्येऽनुसंयंति यथाकर्म यथाश्रुतम् ।।७।।**

## अन्वयार्थ

काही आत्मे शरीरधारण करण्याकरिता प्राण्यांच्या योनीत प्रवेश करतात; **अन्ये स्थणुम् अनुसंयन्ति** - (तर) इतर काही (वृक्षादी), **स्थावर** - भावात, **यथाकर्म, यथाश्रुतम्** - त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार आणि ज्ञानानुसार.

## भावार्थ

आपल्या सर्व बुद्धीनुसार देहधारण करण्यासाठी जीव कोणत्यातरी योनीत प्रवेश करतात. काही वनस्पती (व स्थावर) भावाने अखंड राहतात.

## ।। मंत्र ८ ।।

**य एष सुप्तेषु जागर्ति । कामं कामं पुरूषो निर्मिमाणः ।**
**तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ।।**
**तस्मिंल्लोकाः श्रिताः सर्वे ।**
**तदु नात्येति कश्चन ।**
**एतद् वै तत् ।।८।।**

## अन्वयार्थ

**यः एषः पुरूषः** - जो हा पुरुष सर्व प्राणशक्ती झोपल्या असताना स्वप्नामध्ये सर्व इच्छित वस्तूंची कामना करीत जागा असतो; **तत् एव शुक्रम्** - तेच शुद्ध; **तत् ब्रह्म** - तेच 'ब्रह्म' (होय); **तत् एव अमृतम् उच्यते** - त्यालाच अमृत म्हणतात; **तस्मिन सर्वे लोकाः श्रिताः** - त्याच्यामध्ये सर्व विश्वे आश्रय घेतात. **तत् उन अत्येति कच्चन** - 'त्याच्या' अतीत कोणीही होऊ शकत नाही; **एतत् वै तत्** - तेच हे (ब्रह्म) होय.

## भावार्थ

जो 'पुरुष' सर्व प्राणशक्ती झोपल्या असताना सर्व कामनांना आकार देत देत (स्वप्नामध्ये) जागा असतो तेच शुद्ध 'ब्रह्म' होय. त्यालाच अमृत म्हणतात. 'त्याच्या' मध्येच सर्व विश्वे आश्रय घेतात. त्याच्या अतीत कोणीही होऊ शकत नाही; हेच ते खचितच ब्रह्म.

सहाव्या मंत्रात यमराज जीवाच्या मरणोत्तर गतीचे वर्णन करीत आहेत. येथे पुनर्जन्माचा सिद्धांत सांगितला आहे. सहाव्या मंत्रात आत्म्याच्या नित्य अस्तित्वाचे प्रमाण सांगितले आहे. अज्ञान व भ्रांती या अवस्थेत जेव्हा जीव देह सोडतो त्या वेळी त्याला पुन्हा जीवन प्राप्त होते. शुद्ध चैतन्यतत्त्व देहावर सत्ता गाजवते व देह नाहीसा झाला की मठातले आकाश मठ फुटल्यानंतर आकाशाशी मिळून जाते. देहात असताना व देहात नसताना या आत्मतत्त्वामध्ये काहीही बदल होत नाही. मनबुद्धीमध्ये म्हणजेच चिदाकाशामध्ये प्रतिबिंबित झालेले परमोच्च आत्मतत्त्व म्हणजेच जीव. असा हा जीव आपल्या सर्व वासनांसह एक देह सोडतो व दुसरा जन्म घेण्याकरता तो दुसऱ्या योनीत प्रवेश करतो.



हा प्रवेश करताना त्यांना कशी गती मिळते त्याचे वर्णन सातव्या मंत्रात केले आहे. येथे कर्म विपाक सिद्धांत प्रतिपादिला आहे. पुनर्जन्म हा त्या त्या जीवाच्या कर्मानुसार त्याला प्राप्त होतो. मूढ, अज्ञानी, भ्रांत अशा जीवांना जारज, अंडज अशा अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो. काही घोर, पापी लोकांना त्यांच्या कर्मानुसार स्थाणु - जंगम म्हणजे वृक्ष किंवा अचेतन दगड होऊनही राहावे लागते. ज्याने जसे कर्म केले असेल त्याला त्या कर्मातील बोधाच्या अनुसार पुनर्जन्म मिळतो. भगवंत अंतर्यामी वसत असल्यामुळे जीवाचा बोध कसा असतो त्याचे पूर्ण ज्ञान आत्मतत्त्वाला नाही. उत्तम कर्म करत असताना जर शुद्ध हेतू मनात नसेल तर त्या कर्माचे चांगले फळ मिळत नाही. म्हणून जसे कर्म व मरण समयी जशी बुद्धी व जसा बोध तसा पुढील जन्म यासाठी ब्रह्मयज्ञ करावा, असे यमराजाने सुचविले आहे. असा यज्ञ करत असताना तो यथासांग व्हावा म्हणजे जीव जन्म-मरणाच्या रहाटगाडग्यातून सुटू शकतो. त्याचे वर्णन आठव्या मंत्रात केले आहे. जागृती, स्वप्न व शुषुप्ती या तिन्ही अवस्थांमध्ये तेच आत्मतत्त्व सर्व इंद्रियांना प्रकाशित करीत असते, पण या सर्व अनुभव विश्वामध्ये ते आत्मतत्त्व मात्र द्रष्टारूपाने राहत असते. आत्मा केवळ साक्षी असल्यामुळे तो शुद्ध व पवित्रच असतो. या देहरूपी शरीराचा जसा तो नियंता आहे तसाच तो शाश्वत ब्रह्म असून संपूर्ण विश्वाचा नियंता आहे. तोच या जगात भरून राहिला आहे. तोच चित्स्वरूप आहे व तोच अखिलाधार आहे. तोच ईशावाश्य म्हणजे सबंध जगाला व्यापून राहिला आहे. समस्त विश्व ही त्याचीच लीला आहे. आपले जीवन व मृत्यू ही सुद्धा त्याचीच लीला आहे. एक देह सोडून जीवाच्या कर्मानुसार ज्या वेळी तो दुसरा देह धारण करतो त्या वेळी अज्ञानी लोक असे म्हणतात की, जीव मरण पावला. पण वस्तुतः शरीराच्या जन्माने तो जन्मत नाही अथवा शरीराच्या मरणाने तो मरतही नाही. आत्मा हा अज, नित्य, शाश्वत असा असून तो शरीरामागून शरीरे धारण करून जीवन-मृत्यूची लीला करीत असतो.

## || मंत्र ९ ||

## आत्म्याची व्याप्ती

**अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ||९||**

### अन्वयार्थ

**यथा अग्निः** - जसा अग्नी - जगात प्रविष्ट झाल्यावर एक असूनही तो जी जी वस्तू तापवितो त्याप्रमाणे निरनिराळे आकार धारण करतो; **तथा** - तसेच; **सर्व भूतान्तरात्मा एकः (अपिः)** - सर्वांच्या अंतर्यामी असणारा हा शाश्वत आत्मा एक असूनही; **रूपम् रूपम् प्रतिरूपः (बभूव)** - तो ज्या देहात प्रवेश करतो त्यानुसार रूपे धारण करतो; **बहिश्च** - आणि (स्वतः मात्र) त्याच्या बाहेरही असतो.

### भावार्थ

ज्याप्रमाणे अग्नी एकच असूनही तो ज्या ज्या वस्तूंत प्रवेश करतो त्यानुसार आकार धारण करतो; त्याचप्रमाणे सर्व प्राणिमात्रातील आत्मा एकच असूनही त्या त्या देहानुरूप असतो (बाह्यरूप धारण करतो), आणि स्वतः मात्र त्यांच्याहून भिन्नही असतो.

## || मंत्र १० ||

**वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ||१०||**

### अन्वयार्थ

**(अपि)** - वायू, जगात प्रविष्ट झाल्यावर जसा एक असूनही; **रूपम् रूपम् प्रतिरूपः बभूव** - जो ज्याच्यात शिरतो त्यानुसार निरनिराळी रूपे धारण करतो; तसा सर्वांच्या अंतर्यामी असणारा हा शाश्वत 'आत्मा' एकच असला तरी; **रूपः रूपम् प्रतिरूपम् (बभूव) बहिश्च** - तो ज्याच्यात शिरतो त्याची रूपे धारण करतो, आणि त्याच्या बाहेरही असतो.



### भावार्थ

ज्याप्रमाणे भूलोकावरील वायू ज्यामध्ये प्रवेश करतो त्याच्या आकारासारखा होतो, त्याप्रमाणे सर्व भूतांमध्ये एकच अंतरात्मा प्रत्येक रूपाप्रमाणे होऊन आत व बाहेर तोच असतो.

## || मंत्र ११ ||

**सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुनं लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ।**
**एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ||११||**

### अन्वयार्थ

ज्याप्रमाणे सर्व विश्वाचा नेत्र जो सूर्य - लौकिक डोळ्यांच्या (आपल्या) बाह्य दोषांनी प्रदूषित होत नाही; **तथा सर्वभूतान्तरात्मा एकः (अपि)** - तसेच सर्वांच्या अंतर्यामी असणारा हा शाश्वत आत्मा; **लोकदुःखेन बाह्यः (न लिप्यते)** - जगाच्या बाह्य दुःखांनी प्रदूषित होत नाही.

### भावार्थ

जसे सर्व विश्वांचा नेत्र असा सूर्य लौकिक नेत्रांच्या बाह्य दोषांनी प्रदूषित होत नाही; तद्वतच सर्वांच्या अंतर्यामी असणारा शाश्वत आत्मा जगाच्या बाह्य दुःखांनी प्रदूषित होत नाही.

नवव्या मंत्रामध्ये यमराज आत्म्याच्या व्याप्तीचे वर्णन करीत आहेत. जेव्हा अग्नी एखाद्या पदार्थाला ग्रासतो त्या वेळी तो त्याच्याच आकाराचा होतो, पण म्हणून जेवढे पदार्थ तेवढे अग्नी नसतात. संपूर्ण विश्वात नाना नामरूपांनी सर्व भूतांच्या आत तोच राहतो व बाहेरही तोच असतो, कारण सर्व काही तोच आहे. जेवढ्या वस्तू किंवा जेवढी शरीरे तेवढे आत्मे आहेत. असा अज्ञानजन्य मोह अविद्या दूर झाली की नाहीसा होतो. जीवाच्या आत जे आत्मबिंब प्रकाशमान असते त्याचे बुद्धीमध्ये प्रतिबिंब पडते व दोन्हींच्या मध्ये अविद्यास्वरूप आभास असतो. ह्या अविद्येनेच जाणीव निर्माण होऊन ते भ्रामक मनाची निर्मिती हीच उपाधी ठरते व ती भिन्न भिन्न असते. पण ही उपाधी नाहीशी झाली असता नामरूपेही नाहीशी होऊन स्वरूपात रममाण असलेला एकमेव आत्मा तेवढा राहतो. हे ऐक्य दाखविण्यासाठी दहाव्या मंत्रात आत्म्याला वायूची उपमा दिली आहे.

सत्य तत्त्वाची म्हणजे आत्मा एकच आहे हे सांगण्यासाठी वायूचा सुंदर दृष्टांत या मंत्रात योजला आहे. अग्नीऐवजी येथे वायूचे उदाहरण आहे. सर्व

सजीव मग तो घोडा, गाढव वा मनुष्य असो की, वृक्षवल्ली असोत. ते सर्व त्याच जीवदायी ऑक्सिजन वायूवर जगतात. असा तो वायू त्या त्या भूतामध्ये त्यांचा त्यांचा प्राण होऊन राहतो. जसा तो अंतर्यामात असतो तसा तो बाहेरही असतो. तसा वायूप्रमाणे सर्वत्र असणारा शाश्वत आत्मा एकच असला तरी तो ज्याच्यात शिरतो त्याची रूपे धारण करतो. असा हा आत्मा सर्वत्र असूनही अलिप्त कसा असतो त्याचे वर्णन अकराव्या मंत्रामध्ये केले आहे.

सर्व विश्वाचा नेत्र म्हणजे सूर्य ही नेत्रेंद्रियाची अधिष्ठात्री देवता आहे. असा हा सूर्य जेव्हा जगाला प्रकाश देतो त्या वेळी तो चांगल्या-वाईट कर्माच्या लोकांना सारखाच प्रकाश देतो. एखादे पुण्यप्रद असे कर्म असो किंवा निंद्य पापकर्म असो, अशा दोन्हीही कर्मापासून सूर्याला बाधा होत नाही. सूर्य या सर्व कर्मामध्ये संपूर्ण अलिप्त असतो त्याप्रमाणे सर्व भूतांच्या अंतर्यामी असलेल्या त्या आत्म्याला त्या जीवाच्या सुखदुःखाचा स्पर्शही होत नाही. जसे घरातील दिव्याच्या प्रकाशात घरातील सर्व चांगली-वाईट कर्मे होत असतात पण दिवा केवळ साक्षीरूपाने राहिल्यामुळे त्याला कोणतेच कर्म बाधत नाही. आत्मा स्वरूपामध्ये, सच्चिदानंद अवस्थेत नित्य असतो. जीव मात्र अज्ञानामुळे मन व बुद्धी ही अविद्येची रूपे आहेत हे न समजल्यामुळे आत्माच भोक्ता आहे असे समजतो. जीवाला सुखदुःखाचे भोग प्रारब्धाने मिळतात. इंद्रिये, मनबुद्धी यांचा प्रवास त्याप्रमाणे होत असतो पण या सर्व कोलाहलामध्ये आत्मा मात्र अकर्ता, अभोक्ता, द्रष्टा व अलिप्त असतो.

## ।। मंत्र १२ ।।
## आत्मज्ञानी सुखी व शांत असतो

**एको वशी सर्वभूतान्तरात्मा**
**एकं रूपं बहुधा यः करोति ।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यति धीरास्तेषां**
**सुखं शाश्वतं नेतरेषाम् ।।१२।।**

### अन्वयार्थ

जो सर्वांना आपल्या अंकित राखणारा आणि सर्व प्राणिमात्रांच्या अंतर्यामी असणारा आत्मा, **एकम् रूपम् बहु कशति** - स्वतःच्या एकरूपातून अनेक रूपे करतो. त्या आत्मस्थाला जे ओळखतात; **तेषाम् शाश्वतम् सुखम् भवति** - त्यांच्या वाट्याला शाश्वत सुख येते; **न इतरेषाम्** - इतरांच्या नाही.



### भावार्थ

जो एक परमोच्च नियंता, सर्व प्राणिमात्रातील आत्मा, तो आपल्या एका रूपाला अनेकविध करतो; त्या आत्मस्थ परमात्म्यास जे विद्वान ओळखतात त्यांनाच सर्व शाश्वत सुखे प्राप्त होतात, इतरांना नाही.

## ।। मंत्र १३ ।।

**नित्योऽ नित्यानाम् चेतनचेतनानाम्**
**एको बहुनाम् यो विदधाति कामान् ।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीराः**
**तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ।।१३।।**

### अन्वयार्थ

**अनित्यानाम् नित्य** - अनित्य वस्तूमधील नित्य; **चेतनानाम् चेतनः** - बुद्धिवंतामधील प्रज्ञा; **यः एकः (अपि)** - जो एक असूनही अनेकांच्या इच्छा पूर्ण करतो म्हणून; **ये धीराः** - जे विद्वान लोक; त्यांच्या अंतर्यामी राहणाऱ्या त्याला ओळखतात; **तेषाम् शाश्वती शान्तिः (स्यात्)** - त्यांनाच शाश्वत शांती लाभते; **न इतरेषाम्** - इतरांना नाही.

### भावार्थ

जो अनित्य पदार्थात चेतन आहे तो अनेकांच्या इच्छा पूर्ण करणारा आहे. असा त्याला जो विवेकी पुरुष आपल्यातच पाहतो त्यालाच नित्यशांती मिळते. दुसऱ्याला नाही.

## ।। मंत्र १४ ।।

**तदेतदिति मन्यन्तेऽनिर्देश्यं परमं सुखम् ।**
**कथं नु तद्विजानीयां किमु भाति विभाति वा ।।१४।।**

### अन्वयार्थ

ज्याचे वर्णन करता येत नाही त्या 'परमसुखतत्त्वा'ला 'हेच ते होय' असे ऋषीकडून मानले जाते; **तत् कथम् विजानीयाम्** - असा त्या 'आत्मतत्त्वा'ला आम्ही कसे ओळखावे; ते स्वयं प्रकाशित आहे की दुसऱ्याच्या तेजाने ते प्रकाशते?

## भावार्थ

ज्याचे वर्णन करता येत नाही त्या 'परमसुखतत्त्वा'ला 'हेच ते होय' असे ऋषीकडून जाणले जाते. अशा त्या आत्मतत्त्वाला आम्ही कसे जाणावे? ते स्वयं प्रकाशित आहे की दुसऱ्याच्या तेजाने ते प्रकाशते?

## ।। मंत्र १५ ।।

**न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकम्**
**नेमा विद्युतो भान्ती कुतोऽयमग्निः ।**
**तमेव भान्तमनुभाति सर्वं**
**तस्य भासा सर्वमिदं विभाति ।।१५।।**

## अन्वयार्थ

**न तत्र सूर्यः भाति** - तेथे (आत्मतत्त्वाच्या ठिकाणी) सूर्य प्रकाशत नाही; **न चंद्रतारकं** - चंद्रही नाही, तारकाही नाही; **कुतः अयम् अग्निः** - मग अग्नीची गोष्ट कशाला; तो जेव्हा प्रकाशतो तेव्हा प्रत्येक गोष्ट त्यामागून प्रकाशित होते; **इदम् सर्वम् तस्य भासा विभातिः** - ही सर्व त्याच्या प्रकाशाने प्रकाशित होतात.

## भावार्थ

तेथे (जणू) आत्मलोकात सूर्य प्रकाशित होत नाही. चंद्र व तारेही चमकत नाहीत व विजांचाही लखलखाट नसतो, मग तेथे अग्नीचा काय पाड? तो प्रकाशमान असल्यानेच सर्वांना प्रकाश मिळतो. त्याच्या प्रकाशानेच हे सारे काही भासत आहे.

यमराजाने ज्या आत्म्याचे वर्णन केले त्या आत्म्याला जाणूनच चिरंतन सुखाची प्राप्ती होऊ शकते. आपल्यातील आत्मतत्त्वास जाणून घेणे हाच आत्मसाक्षात्काराचा किंवा ईश्वरदर्शनाचा क्षण आहे. हे जाणणे हेच आत्मज्ञान होय. असे हे आत्मज्ञान जाणण्यासाठी आत्मलाभाची साधना आवश्यक आहे. स्वस्वरूपाचे ज्ञान हे मनुष्याला परमशांती देते. आत्मनिग्रही विषय भोगात अनासक्त असा मनुष्य सद्गुरू कृपेने हे आत्मज्ञान करून घेऊ शकतो. या विश्वातील कितीही लौकिक सुखांचा व भोगांचा आस्वाद घेतला तरी शाश्वत सुखाची प्राप्ती होत नाही, हे सर्व शास्त्रांचे सांगणे आहे. जो ह्या आत्म्याला जाणत नाही त्याच्या वाट्याला दुःख हे अटळ आहे, पण जो



जाणतो तो सदोदित सुखरूप होऊन राहतो. अशा आत्मज्ञानी मनुष्यास परमशांती लाभते, हे यमराज तेराव्या मंत्रात सांगतात.

आत्म्याच्या अस्तित्वामुळेच देहात चैतन्य प्रगट करतो. वास्तविक ते चैतन्यच देहाच्या रूपाने प्रगट झालेले असते. तोच चैतन्यमय आत्मा त्या त्या जीवांना त्यांच्या कर्मानुसार फळे देतो. असा जो हृदयात स्थित असलेला आत्मा जो जाणतो त्याला शाश्वत शांती प्राप्त होते.

चौदाव्या मंत्रात यमराजानी स्वतःच प्रश्न उपस्थित केला व त्याचे उत्तर पुढील मंत्रात दिले. असेही इथे म्हणता येईल की, हा प्रश्न म्हणजे नचिकेतामधील तत्त्वज्ञानाच्या परमोच्च अभ्यासकाने विचारलेला प्रश्न आहे. हे परमतत्त्व जड इंद्रियांना अवगत होत नाही. इंद्रिये-मनबुद्धी यांच्या आकलनापलीकडे हे परमतत्त्व आहे. पण अशा आत्मतत्त्वाचा साक्षात्कार आत्मलाभाच्या साधनेने करून घेता येतो. ध्यानाच्या साधनेने मन निर्विषय व निर्विचारी करून अंतर्यामातील शुद्ध जाणीवतत्त्वाची अनुभूती घेता येते. जेव्हा अज्ञान व अविद्येमुळे निर्माण झालेले आपल्याच मनबुद्धीतील विक्षेप थांबतात तेव्हा आपल्या स्वयंप्रकाशाने तो प्रकाशतो. आपण आणि अंतरात्मा यात जे जे अडसर आहेत ते साधनेने दूर करणे म्हणजेच आंतरिक शुद्धी करणे. अशा शुद्ध अंतःकरणात त्याचे दर्शन होते. हा स्वयंप्रकाश कसा आहे त्याचे वर्णन या वल्लीच्या शेवटच्या पंधराव्या मंत्रात यमराजानी केले आहे.

या ठिकाणी यमराज आत्मतत्त्वाच्या स्वयंप्रकाशाची आपल्यास जाणीव करून देत आहेत. सूर्य, चंद्र किंवा तारे या सर्वांमध्ये असलेले तेज या स्वयं ज्ञानप्रकाशाचेच आहे. जोपर्यंत देहात हा स्वयंप्रकाश असतो तोपर्यंतच भौतिक जगातील बाहेरील प्रकाशाचे त्याला ज्ञान होत असते. त्याच आत्मप्रकाशाने इतर सर्व प्रकाशित होत असतात. अनंत कोटी सूर्याला, चंद्र, ताऱ्यांना हा आत्मज्योतीचाच प्रकाश लाभत असतो. तो प्रकाशक स्वयंप्रकाशी आहे म्हणूनच तो इतरांना प्रकाशित करू शकतो.

***येथे द्वितीय अध्यायातील द्वितीय वल्ली समाप्त होते.***

×××

# द्वितीय अध्याय - तृतीय वल्ली

## ।। मंत्र १ ।।
## संसाररूप अश्वत्थवृक्ष

**उर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ।**
**तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ।**
**तस्मिन्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन ।**
**एतत् वै तत् ।।१।।**

### अन्वयार्थ

**(वृक्षः)** - ज्याची मुळे वर आणि शाखा खाली असतात असा हा 'अश्वत्थ' वृक्ष (संसारवृक्ष) अनादी आहे; **तत् एव शुक्रम्** - ते खचितच विशुद्ध ज्योतिः -स्वरूप आहे; **तत् ब्रह्म** - हे ब्रह्म आहे; त्यालाच अमृतत्व म्हणतात; **तस्मिन सर्वे लोकाः श्रिताः** - त्याच्यातच सर्व (गंधर्वादी) लोक आश्रित आहेत; **तत् उ कश्चन न अज्योति** - कोणीही त्याचे अतिक्रमण करू शकत नाही; **एतत् वै तत्** - हेच निश्चयपूर्वक ते 'ब्रह्म' होय.

### भावार्थ

हाच तो सनातन अश्वत्थ वृक्ष की, ज्याची मुळे वर आणि शाखा खाली (पसरलेल्या) असतात. ते खचितच शुद्ध, (ज्योतिस्वरूप) तेच ब्रह्म होय. त्यालाच अमृत म्हटले जाते. संपूर्ण लोक (गंधर्वादी) त्याच्यामध्येच आश्रय घेतात; कोणीही त्याच्याहून श्रेष्ठ नाही; हेच ते निश्चयपूर्वक 'ब्रह्म' होय.

भगवद्गीतेच्या १५ व्या अध्यायातील पहिल्या सहा श्लोकांमध्ये संसार वृक्षाचे म्हणजे ब्रह्मवृक्षाचे - अश्वत्थ वृक्षाचे वर्णन आले आहे. भगवान श्रीकृष्णांनी पहिल्याच श्लोकात या मंत्राला साम्य असणारा श्लोक सांगितला आहे. तो असा -

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**
**छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।।१।।**

**अर्थ** - 'हे अर्जुना! हा संसार म्हणजे अविनाशी असा अश्वत्थ वृक्ष आहे, असे म्हटले जाते. त्याची मुळे वरच्या बाजूस असून फांद्या खाली आहेत. वेद



ही त्याची पाने आहेत. हे वृक्ष ज्याने समग्ररूपात जाणले, तोच वेद जाणणारा म्हणजे ज्ञानी होय.' हा संसार एखाद्या वृक्षाप्रमाणे आहे, पण हा चमत्कारिक वृक्ष आहे की, ज्याची मुळे खाली नसून वर आहेत आणि फांद्या खाली आहेत. मूळ वर आहे याचा अर्थ असा की, त्याची उत्पत्ती ईश्वरापासून झाली आहे. या संसारवृक्षाला अश्वत्थ असे म्हटले आहे आणि अव्ययही. अश्वत्थ शब्दाचे दोन अर्थ होतात. एक म्हणजे पिंपळ. हा वृक्ष पवित्र आहे. या वृक्षाला भगवंतांनी गीतेत आपली विभूती मानली आहे. अश्वत्थ शब्दाचा दुसरा अर्थ आहे - जे उद्या टिकणार नाही' (श्व म्हणजे उद्या, अ म्हणजे नाही आणि त्थ म्हणजे टीकणार). हा संसार दर घडीस पालटणार असल्याने तो अश्वत्थ आहे असे मानले जाते. ही अनित्यता संसाराचे मूलभूत लक्षण आहे. पण त्याचबरोबर हा संसार अनादी काळापासून चालत येत आहे आणि याचा अंत कधी होईल हेही ध्यानात येत नाही. म्हणूनच त्याला अनादी, अव्यय असे म्हटले जाते. भूतांचा प्रभव, प्रलय, पुनःप्रभव, पुनःप्रलय असे सृष्टीचे चक्र सतत सुरू आहे. भिन्न भिन्न असंख्य योनींच्या रूपात या संसारवृक्षाच्या शाखा वर आणि खाली दोन्ही बाजूला पसरल्या आहेत. असा संसार सत्व, रज, तम या प्रकृतीच्या तीन गुणांमुळे वाढत असतो. खरे म्हणजे अश्वत्थ वृक्ष म्हणजे संसार, हे सारे जग या तीन गुणांचाच खेळ आहे. शब्द, रस, स्पर्श, रूप व गंध असे इंद्रियग्राह्य विषय जणू या वृक्षाची कोवळी पालवीच आहेत. मनुष्यलोकात कर्मबंधनात बांधणारी अहंता, ममता आणि कामनारूप वासना या वासातून निघणारी मुळे आहेत आणि तीही खाली व वर सर्वत्र पसरलेली आहेत. क्षणोक्षणी बदलणाऱ्या वृक्षाचे वास्तविक अस्तित्वच नाही. तो फक्त भगवंताची माया म्हणजे देखावा आहे. उलटपक्षी जीवात्मा हा नित्यतत्त्व आणि सर्वेश्वर परमात्म्याचा साक्षात् अंश आहे. पण गंमत अशी की, मायेच्या ह्या खेळात आसक्त होऊन जीवात्म्याने आपले सच्चिदानंद आत्मस्वरूप विसरलेले असते आणि ही आसक्ती दृढमूल झाल्यामुळे तो अगतिक होऊन दुःखी व्याकुळ स्थितीत जन्म-मरणाच्या चक्रात फिरत असतो. ह्या मायामय संसारवृक्षापासून मुक्त होऊन सच्चिदानंद आत्मस्वरूप प्राप्त होण्यासाठी आत्मज्ञानाची आवश्यकता आहे. अशा या संसारवृक्षाला जाणले असता ब्रह्माचेच ज्ञान प्राप्त होते. कारण या अश्वत्थ वृक्षाला निराकार परब्रह्माचेच अधिष्ठान आहे. इतकेच नव्हे तर सच्चिदानंदरूप ब्रह्मच हा वृक्ष झाले आहे. साऱ्या विश्वाला आधार हे ब्रह्मच आहे. अज्ञान, अविद्या व गुणमयी माया आत्मज्ञानाने नाहीशी झाली की, आत्मरूपाची अनुभूती येते. ही आत्मज्योती अमृतमय व सत्य असल्यामुळे

यासारखे दुसरे काही प्राप्तव्य नाही. अशी ही माया जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत ती सतत मनुष्याला फसवत राहते. ज्याप्रमाणे सोन्याच्या दागिन्यात सोने एकवटलेले असते किंवा सागराच्या लाटा जशा सागराहून वेगळ्या नसतात, घटातील आकाश हे जसे महत् आकाशाशी एकरूपच असते किंवा पाण्यात मीठ पडले असताना ते जसे एकरूपच होते तसे हे जगत व ब्रह्म हे एकरूपच आहे. परमात्म तत्त्वापासून जगत वेगळे होऊच शकत नाही. म्हणून हे सर्व विश्व ही त्या ब्रह्माचीच छाया आहे व ते आत्मरूपच आहे.

## ।। मंत्र २ व ३ ।।

## आत्मज्ञानामुळे अमरत्व प्राप्ती

**यदिदं किञ्च जगत सर्वं प्राण एजति निःसृतम ।**
**महद्भयं वज्रमुद्यतं य एतद् विदुरमृतास्ते भवन्ति ।।२।।**

### अन्वयार्थ

हे ब्रह्मापासून उद्‌भूत झालेले संपूर्ण जगत; **प्राणएजति** - प्राणामध्ये (परमोच्च ब्रह्मतत्त्वामध्ये) फिरत असते; **ये एतत् विदुः ते अमृताः भवन्ति** - जे याला जाणतात ते अमर होतात.

### भावार्थ

हे जे सर्व जगत प्राण - ब्रह्मामध्ये उदयास येऊन प्राणात (परमोच्च ब्रह्मतत्त्वात) कार्य करीत राहते; 'ब्रह्म' हे उगारलेल्या वज्राप्रमाणे भयंकर असते. ते याला जाणतात ते 'अमर' होतात.

**भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः ।**
**भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः ।।३।।**

### अन्वयार्थ

त्याच्या भीतीने अग्नी तळपतो; **भयात् सूर्यः तपति** - त्याच्या भीतीने सूर्य प्रकाशतो; **(भयात्) धावति** - त्याच्या भयाने इंद्र, विष्णू आणि पाचवा मृत्यू ही आपापली कार्ये करावयास पुढे येतात.



### भावार्थ

त्याच्या भीतीने 'अग्नी' तळपतो, 'सूर्य' प्रकाशतो, 'इंद्र', 'वरुण' आणि पाचवा 'मृत्यू' आपापली कार्ये करतात.

ब्रह्म म्हणजे चैतन्याचा महासागर. याच चैतन्यातून विश्वातील सर्व पदार्थांना चैतन्य व गती प्राप्त होते. ते चैतन्य प्राप्त करून सूर्य जगाला प्रकाश देतो, चंद्र अमृतमय शीतलता देतो. ते चैतन्य प्राप्त करून चंद्र, सूर्य, तारे, ग्रह, नक्षत्रे व आपली पृथ्वीसुद्धा हजारो मैलांच्या वेगाने अवकाशात फिरत आहे. या पृथ्वीवरील सर्व पंचमहाभूतांना त्याचेच चैतन्य प्राप्त झाले आहे. ब्रह्माच्या चैतन्यामुळेच प्राणिमात्रांचा प्राण चालू राहतो. त्याच्याच प्रभावाने इंद्रियांचे सर्व व्यवहार पार पडतात. अखिल ब्रह्मांडाचा संपूर्ण व्यवहार या चैतन्यशक्तीनेच होतो. हे ब्रह्म केवळ चैतन्यच नव्हे तर सत् आणि आनंद म्हणजे सत्तारूप आणि आनंदरूप पण आहे. ब्रह्म हे एकमेव, अद्वितीय, अक्षय भांडार आहे. प्रकृती जग हे त्याच्याच शाश्वत स्पंदनाच्या वेगात प्रचंड वेगाने फिरत राहणारी परिमाणे होत. जेव्हा शास्त्रज्ञांनी परमाणूचे विच्छेदन केले तेव्हा त्यांनी असे सिद्ध केले की, तो परमाणू मध्यवर्ती अशा 'न्यूट्रॉन'भोवती प्रचंड वेगाने फिरत असलेल्या 'प्रोटॉन' आणि 'इलेक्ट्रॉन' या दोन धन आणि ऋण अशा विद्युतकणांचा बनलेला आहे. म्हणून परमाणू म्हणजे दुसरे काही नसून स्पंदन पावणारे अणू समुच्चयच आहेत. या मंत्रात असे सूचित केले आहे की, सर्व व्यक्त जगाचे उगमस्थान ही काही अचेतन अभावता नव्हे. तर सर्व जीवांचे अंतिम उगमस्थान असलेले चैतन्यतत्त्व हे क्रियाशील आणि गतिमान आहे. अखिल ब्रह्मांडामध्ये सर्व काही गतिमान व तालबद्ध आहे. जणू काही एखाद्या कडक शास्त्यानी घालून दिलेल्या नियमाप्रमाणे व आज्ञेप्रमाणे एक सेकंदाचाही फरक न होता हे सर्व काही चालले आहे. जगात जे जे चैतन्य दिसते त्याला केवळ परब्रह्माचेच अधिष्ठान आहे आणि हे अधिष्ठान प्राणरूपाने संपूर्ण जगाचा व्यवहार करते. स्वतः मात्र साक्षी बनून, काहीही ढवळाढवळ न करता मनुष्याला त्याच्या प्रारब्धामुळे सर्व कर्म फळांची प्राप्ती करून देते.

अशा या परब्रह्माच्या भीतीनेच सर्व पंचमहाभूते आपले अंगभूत व्यवहार नीट चालवतात. इंद्र, वायू, मृत्यू हे त्याच्याच भीतीने आपल्या मार्गावर राहून सर्व व्यवहार नियमपूर्वक पार पाडतात. या परब्रह्माचे अधिष्ठान नसते तर निसर्गसुद्धा तालबद्ध आणि लयबद्ध गतीने चालला नसता.

## ।। मंत्र ४ ।।
## आत्मज्ञान न झाल्यास पुनर्जन्म

**इह चेदशकद् बोद्धुं प्राक् शरीरस्य विस्रसः ।**
**ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते ।।४।।**

### अन्वयार्थ

जर एखादा याच जन्मी देहपातापूर्वीच 'ब्रह्म'ला जाणून घेऊ न शकेल; **ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते** - तर त्याला विश्वनिर्मितीच्या जगात पुन्हा जन्म घ्यावा लागेल.

### भावार्थ

जर एखाद्यास याच जन्मी देहपातापूर्वीच ब्रह्मप्राप्ती होऊ शकली नाही तर, त्याला विश्वनिर्मितीच्या जगात पुन्हा देह धारण करावा लागेल. (नाहीपेक्षा तो संसारबंधापासून मुक्त होईलच.)

ज्याच्या सत्तेमुळे ब्रह्मांडातील सर्व व्यवहार चालतात त्या परमपुरुषाला जोपर्यंत जाणले नाही तोपर्यंत मनुष्याचा जीवभाव जागृत असतो. त्यामुळे या भवसागरात तो सुखदुःखाचे चटके सोसत असतो. पण त्या आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले तर दुःखही संपले व जन्मही खंडित झाला. त्याला पुनर्जन्म लाभत नाही. वैराग्य, निरहंकार व निर्ममत्व याची कास धरून जर साधना केली तर याच जन्मात हे साध्यही करता येते. आत्मज्ञान करून घेण्याची बुद्धी भगवंताने केवळ मनुष्य प्राण्यास दिली आहे. या बुद्धीच्या व प्रयत्नांच्या जोरांवर भोगविषयात न रमता जो श्रेय मार्गाने चालतो त्याला ही आत्मानुभूती याच जन्मी मिळावयास दुर्लभ नाही.

## ।। मंत्र ५ ।।
## आत्म्याचे स्वरूप

**यथादर्शे तथात्मनि यथा स्वप्ने तथा पितृलोके ।**
**यथाप्सु परीव ददृशे तथा गन्धर्वलोके ।**
**छायातपयोरिव ब्रह्मलोके ।।५।।**



### अन्वयार्थ

**(आत्मनः दर्शनम् भवति)** - आरशात स्वच्छ प्रतिबिंब दिसावे तसे आपल्या स्वबुद्धीत 'ब्रह्म' स्पष्ट दिसते; **यथा स्वप्ने तथा पितृलोके** - जसे स्वप्नात दिसावे तसे पितृलोकात; **यथा अप्सु तथा गंधर्वलोके** - जसे पाण्यात दिसावे तसे त्याचे स्पष्ट भान गंधर्वलोकात; - ब्रह्मलोकात (मात्र) छाया आणि प्रकाश जसे स्पष्ट वेगळे दिसतात तसे (अनुभूतीस) येते.

### भावार्थ

आरशात स्वच्छ प्रतिबिंब दिसावे तसे आपल्या स्वतःच्या निर्मल बुद्धीमध्ये 'ब्रह्म' स्पष्ट दिसते. जसे स्वप्नात दिसावे तसे पितृलोकात, जसे पाण्यात दिसावे तसे गंधर्वलोकात. ब्रह्मलोकांत मात्र छाया आणि प्रकाश याप्रमाणे स्पष्ट अनुभूतीस येते.

आत्म्याचे विविध लोकांत विविध दर्शन कसे घडते याचे वर्णन या मंत्रात आले आहे. आरशात आपले प्रतिबिंब स्वच्छ व स्पष्ट दिसावे तसे आपल्या निर्मळ बुद्धीमध्ये आत्म्याचे स्पष्ट प्रतिबिंब दिसते व या शुद्ध बुद्धीमुळे आत्मा आपणास गोचर होतो. पितृलोकामध्ये हा आत्मा स्वप्नात दिसावा तसा दिसतो. जसे जागे झाल्यावर पडलेल्या स्वप्नाचा बोध होत नाही, त्याप्रमाणे पितृलोकातील आत्मज्ञानाची स्थिती आहे. गंधर्वलोकात सतत तरंग उठणाऱ्या पाण्यामध्ये जे प्रतिबिंब अस्पष्ट दिसते त्याप्रमाणे आत्मदर्शन होते. गंधर्वलोकात अत्युच्च सुख देणारे भोग असल्यामुळे व त्या भोगात रममाण झालेल्यांना संयमित मन कसे राहणार? ब्रह्मलोकात मात्र छाया व ऊन जसे स्पष्ट दिसतात तसे आत्मज्ञान स्पष्ट दिसते. पण ब्रह्मलोक प्राप्त करण्यासाठी कठोर साधना असावी लागते. आत्मज्ञान झाल्यावर मनुष्य ईश्वररूप होतो ते आत्मतत्त्व हेच आपले मूळचे स्वरूप असल्यामुळे ते प्राप्त करण्यातच मनुष्यजन्माची सार्थकता आहे. त्यामुळे जोपर्यंत देहात प्राण आहे व सजग बुद्धी आहे तोपर्यंत ही आत्मप्राप्ती करून घ्यावी.

## ।। मंत्र ६ ।।
## इंद्रियाहून आत्म्याचे स्वरूप वेगळे

**इन्द्रियाणाम् पृथग्भावं उदयास्तमयौ च यत् ।**
**पृथगुत्पद्यमानानाम् मत्वा धीरो न शोचति ।।६।।**

### अन्वयार्थ

जो विद्वान पुरुष; पंचमहाभूतांपासून उत्पन्न होणाऱ्या इंद्रियांचा निरनिराळेपणा; **यत् च उदयास्तमयौ पृथक् मत्वा** - आणि त्यांचे उदित होणे आणि मावळणे पृथक् समजतो; **न शोकति** - तो शोक करीत नाही.

### भावार्थ

विद्वान पुरुष, जो पंचमहाभूतांपासून निर्माण झालेली ज्ञानेंद्रिये आत्मतत्त्वाहून भिन्न स्वरूपाची आहेत आणि त्यांची उत्पत्ती आणि नाश भिन्न समजतो, तो शोक करीत नाही.

## ।। मंत्र ७ ।।

**इंद्रियेभ्यः परं मनो मनसः सत्त्वमुत्तमम् ।**
**सत्त्वादधि महानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम् ।।७।।**

### अन्वयार्थ

**इंद्रियेभ्यः परम् मनः** - इंद्रियांपेक्षा मन श्रेष्ठ असते; **मनसः उत्तमम् सत्त्वम्** - मनाहून बुद्धी श्रेष्ठ असते; **अधिसत्वात् महान् आत्मा** - महान आत्मा बुद्धीच्याही पलीकडचा असतो; **महतः उत्तमम् अव्यक्तम्** - अव्यक्त आत्म्याहूनही श्रेष्ठ असते.

### भावार्थ

इंद्रियाहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून महत् व महतत्त्वाहून अव्यक्त उत्तम (सूक्ष्म) आहे.

## ।। मंत्र ८ ।।

**अव्यक्तात् तु परः पुरूषो व्यापकोऽलिंङ्ग एव च ।**
**यं ज्ञात्वा मुच्यते जन्तुरमृतत्वं च गच्छति ।।८।।**



### अन्वयार्थ

अव्यक्ताच्याही पलीकडे परमश्रेष्ठ पुरुष; सर्वव्यापी आणि कोणतीही लक्षणे नसलेला; **यम् ज्ञात्वा** - ज्याचे ज्ञान करून घेतल्यावर; **जन्तुः मुच्यते** - प्राण मुक्त होतो; **अमृतत्त्वम् च गच्छति** - आणि अमृततत्त्वाला पोहोचतो.

### भावार्थ

आणि खचितच अव्यक्ताच्या पलीकडे सर्वव्यापी आणि अलिङ्ग परमश्रेष्ठ पुरुष असतो. ज्याचे ज्ञान करून घेतल्यावर मनुष्यप्राणी मुक्त होतो आणि अमृततत्त्वाला पोहोचतो.

## ।। मंत्र ९ ।।

**न सन्दृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषापश्यति कश्चनैनम् ।**
**हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो य एतद् विदुरमृतास्ते भवन्ति ।।९।।**

### अन्वयार्थ

त्याचे रूप दृष्टीला सापडत नाही; **न कश्चन एनम् चक्षुषा पश्चति** - कुणीही त्याला नेत्रांनी पाहू शकत नाही; जे त्याला मनाचे संयमन करून बुद्धीद्वारा मननरूप ध्यानसाधनेने प्रतीत करून घेतात; **ते अमृता भवन्ति** - ते अमर होतात.

### भावार्थ

ह्या आत्म्याचे रूप दृष्टीत सामावत नाही. त्याला डोळ्याने कोणीही पाहू शकत नाही. हा आत्मा मनाचे नियमन करणाऱ्या हृदयस्थ बुद्धीद्वारा मननरूप सम्यक् दर्शनाने कळणारा आहे. जे त्याला जाणतात ते अमर होतात.

सहाव्या मंत्रात इंद्रियांचे आत्म्याहून वेगळेपण सांगितले आहे. सर्व पंचमहाभूतांपासून निर्माण झालेली ज्ञानेंद्रिये आत्मतत्त्वाहून सर्वस्वी भिन्न आहेत. ही इंद्रिये निरनिराळ्या कारणांपासून निर्माण झालेली असतात. जसे विषय वस्तू बदलतात तशी ही इंद्रियेसुद्धा बदलतात पण आत्मा मात्र नित्य, अकर्ता, निर्विकार व सच्चिदानंद असल्यामुळे त्याला इंद्रियांप्रमाणे वेगवेगळ्या अवस्था नसतात. इंद्रियाना मात्र सुख-दुःख, स्वप्न-जागृती, राग-लोभ अशा अनेक अवस्था असतात. अशा या इंद्रियांपासून वेगळा असणाऱ्या आत्म्याला जो

विवेकी पुरुष जाणतो तो शोकसागर पार करतो व परिपूर्ण आनंदाच्या अवस्थेत जीवन व्यतीत करतो.

इंद्रियाहून मन, मनाहून बुद्धी, बुद्धीहून महत् व महत् तत्त्वाहून अव्यक्त हे श्रेष्ठ आहे. अव्यक्ताहून श्रेष्ठ तोच सर्वव्यापक परमपुरुष आहे. हे श्लोक म्हणजे मागे येऊन गेलेल्या श्लोकांची पुनरावृत्ती आहे. भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायातील ४२ व ४३ हे श्लोकसुद्धा याच अर्थाचे आहेत. महत् व अव्यक्त अशी सूक्ष्मतत्त्वेसुद्धा परमपुरुषाच्या सूक्ष्मत्वास समाविष्ट आहेत. बुद्धीने जे जे जाणले जाते त्याला सलिंङग ज्ञान असे म्हणतात. आत्मा बुद्धीलाही त्याचे ज्ञान होऊ देत नाही त्यामुळे आत्मा अलिंङग आहे म्हणून अशी बुद्धी सर्वस्वी शुद्ध करून शास्त्र मार्गाने आत्म्याशी अनुसंधान साधावे. अनंत जन्मांच्या वासनेच्या गाठी व संस्कार यामुळे ही मनबुद्धी विकारित झालेली असते. यातील सर्व विक्षेप जेव्हा निघून जातात व वासनेच्या ग्रंथी सुटून जातात तेव्हा आत्मतत्त्वाचा बोध होतो व असा बोध झाला की, त्याला अमरत्व प्राप्त होते.

अशा अलिंङग स्वरूप असलेल्या आत्म्याला कसे प्राप्त करावे हे नवव्या मंत्रात सांगितले आहे. हा आत्मा जड इंद्रियांना अनुभवता येत नाही. डोळ्याने त्याला पाहता येत नाही. पण जेव्हा मन निर्विषय व निर्विकार होते, जेव्हा त्याचे संकल्प-विकल्प थांबतात तेव्हा शुद्धबुद्धीने याला जाणता येते. याप्रमाणे अंतःशुद्धी होऊन आत्मज्ञान प्राप्त होते.

## ।। मंत्र १० ।।

**यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ।**
**बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ।।१०।।**

### अन्वयार्थ

**यदा पञ्च ज्ञानानि मनसा सह अवतिष्ठन्ते** - जेव्हा पंचज्ञानेंद्रिये मनासह शांत होतात; **बुद्धिश्च न विचेष्टते** - आणि बुद्धी कार्य करावयाची थांबते तेव्हा; **ताम् आहुः परमाम् गतिम्** - त्या अवस्थेला परमगती म्हणतात.

### भावार्थ

ज्या वेळी पाच ज्ञानेंद्रिये मनासह (आत्म्याच्या ठिकाणी) स्थिर होतात व बुद्धीचे व्यापार थांबतात, त्या अवस्थेलाच परमगती म्हणतात.



## ।। मंत्र ११ ।।

**तां योगमिती मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणम् ।**
**अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ।।११।।**

### अन्वयार्थ

**ताम् स्थिराम् इंद्रियधारणम् योगम् इति मन्यन्ते** - संपूर्ण इंद्रियनिग्रहास ते 'योग' म्हणून समजतात तेव्हा तो (योगी) प्रमादरहित होतो (मनाच्या सर्व विक्षेपांपासून मुक्त); **योगः प्रभवाप्ययौ** - (कारण) योग जसा साधतो तसा तो गमावला जातो.

### भावार्थ

त्या स्थिर इंद्रियधारणेला योग म्हणतात, त्या वेळी योगी पुरुष प्रमादरहित होतो; कारण योग उत्पत्ती आणि नाशरूप आहे.

ज्या वेळी पाच ज्ञानेंद्रिये अंतःकरणासह आत्म्याच्या ठायीच स्थिर राहतात व बुद्धीही स्थिर राहते त्या अवस्थेला श्रेष्ठगती म्हणतात. या श्रेष्ठगतीस व इंद्रियांच्या स्थिर अवस्थेला योग असे म्हणतात. बुद्धीची ब्रह्माच्या ठिकाणी स्थिरता म्हणजेच योग होय. असा योगच साधकाच्या ठिकाणी उत्पन्न झालेल्या प्रमादांचा नाश करतो. अशी बुद्धी जेव्हा आत्मस्वरूपात तादात्म्य पावते तीच योगबुद्धी. अशी बुद्धी मनुष्याला साक्षात्कारापर्यंत नेण्यास समर्थ असते. मनबुद्धी जेव्हा विषयात रमत असतात त्या वेळी प्रमाद होण्याची शक्यता असते. बुद्धीत अनेक प्रसंगी ध्यानाच्या वेळी विक्षेप होण्याचा संभव असतो पण जेव्हा ते आत्मस्वरूपावर स्थिर होतात त्या वेळी हे सर्व प्रमाद नाहीसे होतात. आत्मज्ञान अशा मनबुद्धीतच प्रसवते.

## ।।मंत्र १२ ।।

## ब्रह्माचे सद्स्वरूप

**नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।**
**अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ।।१२।।**

अन्वयार्थ

**न एव वाचा न मनसा न चक्षुषा प्राप्तुम् शक्यः** - (तो आत्मा) ना वाणीने प्राप्त होणे शक्य आहे, ना मनाने, ना नेत्राने; 'तो आहे' असे म्हणतात त्यांच्याहून इतरांना तो प्राप्त करून घेणे कसे शक्य आहे?

भावार्थ

तो आत्मा वाणीने, मनाने व डोळ्याने प्राप्त होत नाही 'तो आहे' असे म्हणणाऱ्यांना कोणत्या प्रकाराने कोठे उपलब्ध होतो?

## ।। मंत्र १३ ।।

**अस्तित्येवोपलब्धव्यस्तत्त्वभावेन चोभयोः ।**
**अस्तित्येवोप्लब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति ।।१३।।**

अन्वयार्थ

'ते आहे' आणि तो सत्यतः आहेच; या तत्त्वभावनेच त्याला जाणून घ्यावे; **उभयोः च अस्ति इति एव उपलब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति** - दोन्ही प्रकारच्या उपलब्धींमध्ये ज्याला 'तो आहे' उपलब्ध झालेली आहे त्यालाच सत्य स्वरूप व्यक्त होते.

भावार्थ

'ते आहे' (अस्ति) आणि तो खरोखर आहेच या भावानेसुद्धा 'आत्मा' जाणावा या दोन्ही (उपलब्धी) पैकी जो त्याला 'अस्ति इति' या भावनेने जाणतो त्यालाच त्याचे सत्य स्वरूप व्यक्त होते.

आत्मा हा मनाने, वाणीने व डोळ्याने जाणता येत नाही तर मग तो ईश्वरनिष्ठांना कसा कळतो? विश्व डोळ्याला दिसते व या विश्वाचा आधार ते परमतत्त्वच आहे व त्याच्याच अधिष्ठानामुळे सृष्टीचे व्यवहार चालतात. हे सर्व शास्त्र सांगते पण प्रत्यक्षात इंद्रियांना याची प्रचिती येत नाही. जसे सोन्याचे दागिने दिसतात किंवा मातीचा घट दिसतो पण त्यातील शुद्ध सोने व माती दिसत नाही. सर्व काही बुद्धीने आणि मनाने जाणावयाचे आहे पण मन जेव्हा अमन बनते व बुद्धी जेव्हा निर्विषयी होते तेव्हा हे ज्ञान कसे व कोठून मिळणार? याचे उत्तर तेराव्या मंत्रात दिले आहे.



जो आत्मा जाणावयाचा तो निश्चित आहे अशी मनाची पक्की धारणा करावी व बुद्धीमध्ये दृढनिश्चय करून आत्म्याचे अनुसंधान करण्याचा प्रयत्न करावा. जेव्हा बुद्धी शुद्ध होते व मन इंद्रियासह लीन होते तेव्हा अशा बुद्धीतच आत्मप्रकाश प्रकट होतो. अशा वेळी संपूर्ण सृष्टीच त्याला ब्रह्ममय भासायला लागते.

## ।। मंत्र १४ ।।

## ब्रह्मज्ञानामुळे सर्व इच्छांचा नाश

**यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।।१४।।**

अन्वयार्थ

**यदा हृदयस्य सर्वे ग्रंथयः इह प्रभिद्यन्ते** - जेव्हा सर्व हृदय ग्रंथी याच जन्मी तुटतात; **अथ मर्त्यः अमृतः भवति** - तेव्हा मर्त्य (मानव) अमर होतो. **एतावत् अनुशासनम्** - अशा सर्व वेदांच्या आज्ञा आहेत.

भावार्थ

ज्या वेळी ह्या हृदयाच्या आश्रयाला राहिलेल्या संपूर्ण कामना निघून जातात तेव्हा हा मर्त्य (असूनही) अमर होतो आणि ह्याच देहात असताना ब्रह्मभावाला प्राप्त होतो.

## ।। मंत्र १५ ।।

**यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रंथयः ।**
**अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावदनुशासनम् ।।१५।।**

अन्वयार्थ

**यदा हृदयस्थ सर्वे ग्रंथयः इह प्रभिद्यन्ते** - जेव्हा सर्व हृदयी ग्रंथी याच जन्मी तुटतात; **अथ मर्त्यः अमृतः भवति** - तेव्हा मर्त्य (मानव) अमर होतो. **एतावत् अनुशासनम्** - अशा सर्व वेदांच्या आज्ञा आहेत.

भावार्थ

याच जन्मी जेव्हा सर्व हृदयग्रंथी तुटतात तेव्हा मर्त्य मानव अमर होतो, अशा सर्व वेदांच्या आज्ञा आहेत.

जेव्हा मनबुद्धीला होणाऱ्या कामना, इच्छा नाहीशा होतात तेव्हा नाशवंत देहात जगत असतानासुद्धा तो ब्रह्मभाव प्राप्त करू शकतो कारण वासनारहित स्थिती म्हणजे कैवल्यावस्था अथवा चैतन्यावस्था होय. देहात्मकता जाऊन आत्मबुद्धीने तो या अवस्थेत देवत्व प्राप्त करून घेऊ शकतो. पण ज्यांना शरीर हेच सर्व काही असे वाटत असते त्या वेळी त्यांना दुःख प्राप्त होते. अविद्या, इच्छा व कर्माच्या फेऱ्यात जे सापडतात ते जन्म-मरणात अडकतात. ज्या वेळी चिदाभासाला आत्मज्ञान होते तेव्हा बुद्धी व देहाचे तादात्म्य नाहीसे होते.

अविद्या, काम, कर्म या सर्वांना मिळून वेदान्त तत्त्वज्ञानात त्यांना हृदयग्रंथी म्हणतात. या मतानुसार अविद्या म्हणजे मानवाची आपल्या स्वतःच्या शाश्वत स्वरूपाची विस्पृती होय. या अज्ञानामुळेच त्याच्यात भ्रांती निर्माण होते. हीच अविद्या ही मानसिक पातळीवरील कामना आहे व या कामनाच बाह्य विषयवस्तू जगतात कर्मरूपाने व्यक्त होतात. जेव्हा मनुष्य आपल्या जीवनकालात या ग्रंथींचा भेद करतो तेव्हा वस्तुतः त्याच्या अज्ञानाचा नाश होतो. ज्ञान झाले तरच अज्ञान निघून जाते. आत्मज्ञानाने जेव्हा हृदयग्रंथी मोडून पडतात तेव्हा हेच ज्ञान त्याला कैवल्यावस्था प्राप्त करून देते. ह्याच जीवनामध्ये अशा प्रकारे जीवन ब्रह्मरूप होऊ शकतो.

## ।। मंत्र १६ ।।

## सुशुम्ना माहात्म्य

**शंत चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका ।**
**तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्न्या उत्क्रमणे भवन्ति ।।१६।।**

### अन्वयार्थ

**शतम् च एका च हृदयस्य नाड्यः** - हृदयाच्या एकशे एक नाड्या असतात; **तसाम् एका मूर्धानम् अभिनिःसृता** - त्यापैकी एक सुशुम्ना मस्तकाच्या सर्वात वरील भागात शिरलेली असते; **तयाः ऊर्ध्वम् आयन् अमृतम् एति** - त्यामधून तो मानव ऊर्ध्वगती मिळवून अमरत्वाला (जातो) पोहोचतो; **विष्वङ् अन्याः उत्क्रमणे भवन्ति** - परंतु इतर नाड्या विभागून निरनिराळ्या मार्गाने जातात.

### भावार्थ

हृदयाला एकशे एक नाड्या असतात. त्यातील एक (सुशुम्ना) ब्रह्मरंध्राचा भेद करून(सूर्यमंडळापर्यंत) गेली आहे. तिच्या वाटेने वरच्या दिशेने जाणारा अमर होतो. बस! संपूर्ण वेदान्तशास्त्रांची हीच आज्ञा आहे.



हृदयात एकशे एक नाड्या असतात, त्यात सुशुम्ना नाडी ही सर्वश्रेष्ठ आहे. एकशे एक सूक्ष्म नाड्यांचा हा सूक्ष्म अध्यात्म देह बनलेला आहे असे मानले जाते. मरणाच्यावेळी ह्या सुशुम्ना मार्गाने जो जातो तो ब्रह्मलोकात सुखाने राहतो. ज्याने आपल्या जीवनात अपरब्रह्माची प्राप्ती करून घेतली आहे असा ध्यान करणाऱ्यांचा जीव मरणकाळी सुशुम्नेतून बाहेर पडतो आणि निरनिराळ्या लोकांतील अनुभव घेत तो ब्रह्मलोकास पोहोचतो. इतर नाड्यांचे मार्गाने जे जातात त्यांना जन्ममरणरूप संसारात परत यावे लागते.

## ।। मंत्र १७ ।।

## आत्म्याचे शुद्ध ब्रह्मस्वरूप

**अंगुष्ठमात्रः पुरूषोऽन्तरात्मासदा जनानाम् हृदये सन्निविष्टः ।**
**तं स्वाच्छरीरात् प्रवहेन्मुञ्जा दिवेषीकां धैर्येण ।।**
**तं विद्याच्छुक्रममृतं तं विद्याच्छुक्रमममृतमिति ।।१७।।**

### अन्वयार्थ

अंगठ्याच्या आकाराचा हा 'पुरुष', 'अंतरात्मा' हा प्राणिमात्रांच्या हृदयस्थानी सदैव स्थित असतो; (साधकाने) त्याला आपल्या शरीरातून बाहेर काढावे; **मुञ्जात् इषीकाम् इव** - मुञ्जा नावाच्या वेळूतून आतील गाभा काढतात तसे; **तम् शुक्रम् अमृतम्** - त्याला शुद्ध समजावे; **तम् शुक्रम् अमृतम् विद्यात्** - त्याला अमर (नाशहीन) समजावे; - त्याला शुद्ध आणि अमर समजावे.

### भावार्थ

अंतरात्मा असलेला अङ्गुष्ठमात्र पुरुष सर्वदा हृदयप्रदेशात राहतो. कोमल तंतूप्रमाणे त्याला धैर्याने शरीराबाहेर काढावे (तो शरीरापासून निराळा आहे असा अनुभव घ्यावा) तोच शुद्ध व अमृतरूप आहे असे जाणावे.

अंगुष्ठप्रमाण म्हणजे एखाद्याच्या अंगठ्याच्या आकाराप्रमाणे हा आत्मा हृदयाच्या केंद्रस्थानी वसलेला आहे. वास्तविक आत्म्याला आकार आणि रूप नसते तरी पण ध्यानमार्गात असताना ती सुलभ व्हावी म्हणून या आत्मतत्त्वास आकार आणि रूप आहे हे आपण पूर्वीच पाहिले आहे. मनुष्यातील सर्व शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक अशा क्रियांचा तो नियामक असतो. असे हे शुद्ध चैतन्य किंवा आत्मतत्त्व हे आपल्या स्थूल शरीर, सूक्ष्म शरीर व कारण शरीर अशा सर्व शरीरापेक्षा वेगळे आहे असे जाणावे. जेव्हा आत्मा शुद्ध, अज, अमर्त्य, सर्वव्यापी आहे अशी अनुभूती येते त्या वेळी जीव ब्रह्मैक्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतो.

## ।। मंत्र १८ ।।

मृत्युप्रोक्तां नचिकेतोऽथ लब्ध्वा
विद्यामेतां योगविधिंऽच कृत्स्नम् ।
ब्रह्मप्राप्तो विरजोऽभूद् विमृत्युः
अन्योऽप्येवं यो विदध्यात्ममेव ।।१८।।

### अन्वयार्थ

**अथ नचिकेतः** - त्यानंतर नचिकेताने; यमराजाने शिकविलेली ही विद्या (ब्रह्मविद्या) आणि संपूर्ण योगविधीचे ज्ञान मिळविल्यावर; **विरजः विमृत्युः अभूत्** - दोषापासून आणि मृत्यूपासून मुक्त झाला; **यः अन्यः अपि अध्यात्मम् वित्** - जो दुसरा कोणी अंतरात्म्यास जाणतो; **(सः) ब्रह्मप्राप्तः (भवति)** - तोही ब्रह्मपद प्राप्त करील.

### भावार्थ

भगवान यमराजाने सांगितलेली संपूर्ण ब्रह्मविद्या, आणि योगविधी प्राप्त करून नचिकेत धर्मांधर्म शून्य (विरज) आणि मृत्यूहीन होऊन ब्रह्मभावास प्राप्त झाला. दुसराही कोणी त्याप्रकारे अध्यात्मतत्त्व जाणील आणि तसाच होईल.

या १८ व्या मंत्रानी यमनचिकेता या आख्यायिकेचा म्हणजे कठोपनिषदाचा शेवट झाला आहे. मृत्युदेवता यमराजाकडून नचिकेताने आत्मविद्या प्राप्त केली. त्या आत्म्याची प्रत्यक्ष अनुभूती, साक्षात्कार करून घेऊन नचिकेता या संसारबंधानातून मुक्त झाला. त्याने स्वस्वरूपाचे ज्ञान मिळवून कर्मबंधनातून सुटका करून घेतली. भवसागरातून बंधमुक्त होऊन तो ब्रह्मपदी स्थित झाला. यमराजाकडून नचिकेताला या दोन्ही गोष्टी प्राप्त झाल्या. पहिली आत्मविद्या व दुसरी आत्मलाभाची साधना. यमराजाने नचिकेताला केवळ आत्मज्ञानच दिले नाही तर त्या आत्म्याचा प्रत्यक्ष लाभ कसा करून घ्यावयाचा याची रीतही त्यांनी त्याला समजावली. असा जो कोणी आत्मस्वरूपाला जाणतो तो नचिकेतासारखाच अमृततत्त्वाची प्राप्ती करून घेणारा जीवनमुक्त असा ठरतो. याच मनुष्य देहात याच जन्मी, हे देवत्व प्राप्त करून घेता येते याचे मार्गदर्शन या उपनिषदात आहे. म्हणून कठोपनिषदाचे महत्त्व.

***द्वितीय अध्यायाची तृतीय वल्ली येथे समाप्त झाली.***

**।। श्री कृष्णार्पणमस्तु ।।**



## ओम्

## संदर्भ ग्रंथ


१) उपनिषदांचे मराठी भाषांतर
(भारतीय चरित्रकोश मंडळ, पुणे)

२) कठोपनिषद — लेखक : डॉ. श्रीकृष्ण देशमुख

३) कठोपनिषद — स्वामी चिन्मयानंद

४) कठउपनिषदाचे अंतरंग — स्वामी शिवतत्वानंद



# कठोपनिषद

## लेखक - परिचय

**नांव** : प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी

**जन्म** : १९ जानेवारी १९४१ बेळगांव

**शिक्षण** : १) एम.ए. (इंग्रजी - संस्कृत)
२) एम.ए. (मराठी)

**व्यवसाय** : पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर, येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त.

**छंद व आवड** :

- सतत भ्रमण - ५ वेळा एमेरिका -कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणाचा प्रवास.
- वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.
- निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.
- योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्यान व प्रात्याक्षिक

**समाजिक कार्य** :

- श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशी संतसाहित्यावर व भगवद्‌गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.
- गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध. अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय.
- श्रीमद भगवदगीतेचे एकूण पाच खमड प्रकाशित झालेले आहेत.
- ईशावस्योपनिषद व केनोपनिषद ही दोन उपनिषदे प्रकाशित.

**संपर्क** : २४६ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क, कोल्हापूर. ☎ : ०२३१ - ६५१०४४